अुपयोग ज्या दीन अर्भकांना दूध मिळत नाहीं अशांना तें पाजण्याकडे केला असता तर तें कृत्य आगींत ओतण्यापेक्षां किंवा देवाच्या नैवेद्यास—म्हणजेच कोण्यातरी लठ्ठंभटजींच्या पोटांत—ढकलण्यापेक्षां त्या गायीच्या दयाळू कामधेनूपणास अधिक साजेसें नी देवास अधिक मानवेसें झालें नसतें काय? थोडेंबहुत दूध देअून का होअीना, पण ती माणसास तें पाजीत होती, तांवरच ती गाय खरी कामधेनु होती. पण तिला हजारो रुपयांचें मंदिर, त्यांत पंचपक्वान्नाचा नैवेद्य! अिकडे झोपडींत वरून पाणी खाळून ओल येत असलेल्या भुअीवर दीनदरिद्री कुटुंबे कोंबून पडताहेत! नाचण्याची आंबील पोटभर मिळत नाहीं! ज्या गायीला रानावनांतच भटकण्यात नी बांधावरील हिरवळ रवंथण्यात खरी मौज वाटावी, तिला मंदिरांत कोंबल्यानें नी पक्वान्नांच्या पेंढया खाव्या लागल्यानें तिला स्वतःला देखील कोंडवाड्यात घातल्यासारखें वाटत असेल! ही म्हणे गोभक्ति! मनुष्याला जिचें दूध द्यायचं ते आगींत ओतायचें नी अुलट तिच्यावरच मनुष्याच्या निढळाच्या घामानें मिळालेले हजारो रुपये खर्चायचे!

पण कांहीं केलें तरी गाभाऱ्यात पशु बांधला की पशूचा देव होत नाहीं तर गाभाऱ्याचा मात्र गोठा होतो! जिच्या दुधाचा थेंबहि मनुष्यास अुपयोगीं पडत नाहीं तर अुलट जिच्या चरितार्थाचा नी स्तोमाचा बोजा सांभाळण्यासाठीं मनुष्यास हजारों रुपयांचा खर्च सोसावा लागतो, अशा या निकाम्या धेनूपेक्षा, राष्ट्राच्या दृष्टीनें कोणच्याहि कुंभारवाड्यांतील आणा दोन आण्याच्या वैरणीवारी रात्रंदिवस मनुष्याच्या कामाचा बोजा वहाणारी बिचारी गाढवीच खरी कामधेनु ठरते!!

आपल्या आजपर्यंतच्या अवलोकनांत न आलेल्या आणि म्हणूनच 'विलक्षण'—आपण बांधलेल्या सामान्य लक्षणाच्या व्याख्येस सोडून असलेले तें विलक्षण—असें वाटणाऱ्या गोष्टी मनुष्यास प्रत्यहीं आढळतात. सृष्टीचें वैचित्र्य अगाध, मनुष्याचें अवलोकन अुथळ! न विता दूध देणारी गायच काय, पण दूध देणारे बैलहि मधून मधून आढळतात! पुरुषाला सुद्धां अत्युत्कट वात्सल्यानें दुधाचा पान्हा स्तनीं फुटल्याचे विश्वासार्ह दाखले घडलेले आहेत. पुरुषाच्या पोटात गर्भाशय सांपडतात. प्रथम स्त्रीदेह असलेल्या महिला हळुहळू पुरुषपणा पावतात. पण म्हणून त्या दूध देणाऱ्या बैलास वा स्त्रीत्व असून पुढें पुरुष होणाऱ्या स्त्रीस देव वा देवी मानून त्यांचीं देवळें का बांधायचीं? त्यांची मनुष्यानें पूजा करण्यासारखें, त्या लिंगपालटीच्या केवळ दैहिक सृष्टिक्रमानुसार घडणाऱ्या फरकानें, कोणचें देवपण, थोरपण

त्या स्त्रीत वा बैलांत आलें ? तीच स्थिति या गायीची. अुलट जर ती वेळींच व्याली नसेल वा वीत नसेल तर, विअून अनेक वांसरें देअून आमच्या गोवृषांची खिल्लारें वाढविणाऱ्या आणि तरीही भरपूर दूध देणाऱ्या आपल्या नेहमींच्या गायीहून ही अर्धवांझोटी गाय अुपयुक्ततेच्या दृष्टीनें अुलट हीनतर समजली पाहिजे. अंदमानप्रभृति कांहीं प्रदेशीं थोडींतरी शेपूट असलेली माणसें अजून प्रसगीं जन्मतात, जगतात म्हणून काय त्यास हनुमानाचा अवतार समजून देवळांतून पूजाअर्चा करायची ? शेपटीवांचून हनुमानाचा त्याच्यात जोवर कोणचाही गुण प्रकटत नाहीं, तोंवर त्यास मनुष्याच्या नी पशूच्या मधला दुवा असें समजलें पाहिजे. मनुष्याच्या नी देवाच्या मधला नव्हे! मनुष्यासारखे तोंड नी पशूसारखें शेपूट असणें ही कांहीं देवाची व्याख्या नव्हे! तीच स्थिति या गायीची. न गाभण रहातां जिच्या सडांतून दूध येतें, ती देवी – अशी का देवीची व्याख्या आहे ? त्रिगरयत्तेंतील मुलाअितकी देखील बुद्धि ज्या पशूंत नाहीं, त्याला केवळ गाभण न रहाता दूध येतें म्हणून मनुष्याहून अत्यंत श्रेष्ठ अशी देवी मानणें म्हणजे देवपणाचाच नव्हे तर माणुसकीचाही असह्य उपमर्द करणें होय!

आमच्या कादिवलीच्या गोरक्षक बंधूंच्या सदिच्छेविषयीं वा ज्यानीं तें मंदिर बांधलें त्याच्या औदार्याविषयीं आदरच वाटतो. दानामध्यें वा भक्तीमध्यें पात्रापात्र-विवेक असावा आणि राष्ट्रास प्रत्यक्ष उपयोगी तें कृत्य धार्मिक समजावें, अितकेंच आमचें सागणें. त्या दानशूर मंदिरनिर्मित्यास अशी विनंति आहे कीं, त्यांनीं त्या गायीस गाभाऱ्यांतून काढून परत गोठ्यात धाडावें, रानावनातील हिरवा चारा नी ओढ्याचें पाणी यथेच्छ पिअूं द्यावें आणि त्या मंदिरांत टापटिपीच्या नीट खोल्या पाडून त्यांत, अुदाहरणार्थ सुचवावयाचें तर, हिंदु अनाथ महिलांचा अेक आश्रम अुघडावा. श्रद्धानंद हिंदु अनाथ महिलाश्रमासारखी हिंदु राष्ट्राच्या हितास अत्यंत अवश्य असणारी संस्था, स्वतःला घर नाहीं, अर्भकांच्या रक्षणार्थ दमडी नाहीं, म्हणून ज्या मुंबअीस दारोदार भीक मागत आहे, त्याच मुंबअीस अेका पशूला एक मदिर नी पंचपक्वान्नांचे नैवेद्य आरतीधूपारतीसह अर्पिले जावे ही केवढी विवेकशून्यता आहे बरें ! आतां तरी तें मंदिर त्या श्रद्धानंद अनाथाश्रमाच्या चालकांस देअून टाकावें आणि अहिंदूंच्या जाळ्यांत गवसणाऱ्या आपल्या हिंदूंच्या पोटचीं अनाथ लेंकरें सोडवून तीं पाळण्याकडे तो दानधर्म व्ययावा ! तो आजचा खरा धर्माचार! एका दुधाळ पशूस देवता म्हणून पुजणें नी तिचें गोड

दूध भुकेलेल्या पोटच्या लेंकरांच्या तोंडीं न ओततां आगींत ओतणें हे निव्वळ वेडेचार होत !

**ही झाली भाबडी गोभक्ति; आतां ही पहा दांभिक अुंदिरभक्ति !**

प्लेगच्या संकटांतून मनुष्यजातीचा बचाव करण्यासाठीं आमच्या हिंदु-मुसल्मानी देवलसी संस्कृतीनें अनुष्ठानें, यज्ञ, जप, नवस, बोकड मारणें, कोंबडा कापणें, ताअीत, गंडे, कुरबानी, निमाज, प्रार्थना प्रभृति नाना अुपाय करून पाहिले; पण ह्या 'देवलसी' औषधालयांतील अेकाही लसीनें प्लेगचा केसही वांकडा झाला नाहीं.

पण तिकडे युरोपच्या 'विज्ञानलसी' संस्कृतीनें मात्र अशी अेक लस शोधून काढली कीं, जिच्यापुढें प्लेगसारखा भयंकर रोगही दांतीं तृण धरूं लागला. जिथें लाखों लोक पटापट प्लेगला बळी पडायचे, तिथें ती लस टोचताच शेंकडा पंचाहत्तर तरी सुखरूप राहतात, प्लेगनें त्यांच्यावर दांत धरला तरी त्याची त्यांस डसण्याची छाती होत नाहीं. पुन्हा ती लस सोवळ्यानेंच वापरावी वा ओंवळ्यानें, निमाज पढून कीं न पढून, या तिथीला कीं त्या वाराला, आस्तिकानें वा नास्तिकानें, भटास बोलावून वा मुल्लास वा पाद्र्यास, अशा कोणच्याहि भाकड थोतांडाची अटबीट न ठेवतां ! देवाला नमस्कारून टोंचून घ्या वा देवाला धिःकारून, लसीच्या गुणधर्मात लेशमात्र फरक नाही ! सृष्टिनियम तो; प्रत्यक्ष प्रयोगार्ह, प्रत्यक्षसिद्ध, प्रत्यक्षनिष्ठ, पोथीनिष्ठ नव्हे !

प्लेग अकस्मात् अुद्‌भवलाच तर ही लस टोचण्याचा जवळजवळ रामबाण अुपाय शोधून काढूनच तें विज्ञान स्वस्थ बसलें नाहीं, तर प्लेग अुद्‌भवणेंही शक्य तों दुर्घटविण्यासाठीं त्यानें आणखी अेक अमोघ अुपाय काढला—अुंदीर मारून टाकणें ! प्लेगप्रकरणीं अुंदरांचा नायनाट ज्या प्रमाणात होअील त्या प्रमाणात माणसाचा नायनाट होणें थांबूं लागलें. गेल्या दहावीस वर्षांत पहिल्या दहा वर्षांत प्लेगनें जसे मारले तसे लक्षावधि माणूस मारले न जाता वरील दोन अुपायानीं लक्षावधि माणसांचे जीव वाचले. सर्व मनुष्यजातीस आनंद झाला.

महात्मा गांधीनीं बोरसद तालुक्यांतील बेहरा गावीं अलीकडेच अेक भाषण दिलें. त्यांत ते म्हणाले कीं, "या बोरसद तालुक्यांत कांहीं दिवसांपूर्वी प्लेगनें कहर अुडवून दिला होता. तो रोग हटविण्यासाठीं जे अुपाय तुम्हीं योजलेत त्यांत अुंदरांस मारण्याचा अेक अुपाय होता. शेंकडों अुंदीर तुम्हीं त्यासाठीं मारलेत. पण मी

विचारतों कीं, तुमचा जीव जगावा म्हणून अुंदरांचा जीव घेण्यास तुम्हांस काय अधिकार आहे?"

पण सृष्टि अुलट विचारते कीं, माझें नियमन कसें नी कोणच्या नियमानुसार व्हावें तें सृष्टिकर्त्यास देखील सांगूं पहाणारे तुम्ही कोण? माझाच अेक नियम आहे: जीवो जीवस्य जीवनम्! आणि तो नियम अितका दुर्लंघ्य आहे कीं, त्याला जीवदयेवर व्याख्यानें झोडूं निघालेले आढ्यताखोर अहिंसेचे आचार्यही अपवाद नाहींत! त्यांचा जीव जगवायचा प्रश्न आला कीं, तेही अितर जिवांची सरसहा कत्तल करूनच जगण्यास सोडीत नाहींत!

काय म्हणतां, पुरावा हवा? अहो, अुंदरास मारण्याचा मनुष्याला काय अधिकार आहे हें विचारणाऱ्या त्याच अहिंसक वाक्याच्या प्रत्येक आघातासरशीं गांधीजींच्या जिभेच्या फटकाऱ्याखाली लाखों सूक्ष्म जीवाणु मरत होते; आणि त्यांच्या श्वासोच्छ्वासासरशीं लाखलाख सूक्ष्म जंतूंचे मुडदे पडत होते! स्वतःला श्वासितां यावें म्हणून या लाखों जीवांची कत्तल करण्याचा जो गांधीजींना अधिकार, तोच स्वतः जगतां यावें म्हणून लाखों माणसांना लाखों अुंदीर मारण्याचा अधिकार!

त्याच्याही पुढें जाअून माहात्मिक आवेशाची नशा अुपभोगीत गांधीजींनीं टांसून सांगितलें कीं, "अुंदराना माणसाइतकाच जगण्याचा हक्क आहे!" अहो, पण माणसानाही अुंदरांअितका तरी जगण्याचा हक्क आहे, हें अुंदरांच्या प्रत्यक्ष शंकराचार्यांना देखील नाकारतां यावयाचें नाहीं!

मग ज्या परिस्थितींत अेक तर अुंदीर तरी मरतो, नाहींतर माणूस तरी मरतो! असा पेच सृष्टि घालते, तिथें अुंदराच्या जगण्याच्या हक्कासाठीं माणसानींच आपला जगण्याचा हक्क सोडावा असें तरी कोणत्या तोंडानें सांगणार तुम्ही?

या अडचणीसाठींच गांधीजी त्याच्यापुरतें पुढें सांगतात कीं, "निदान माझ्यासारखा अहिंसक तरी अुंदरास मारण्यापेक्षां स्वतःच मरेल." तथास्तु! तथास्तु!

ज्याला आपला जीव अुंदराअितक्याच मूल्याचा वाटतो, त्यानें शक्य तितक्या झटपट तसेंच करावें. आमची ना नाहीं!

पण आम्हांला माणूस आणि अुंदीर, बाजीराव नी बागुरडा, शिवाजी नी शेणकिडा, सारखा वाटत नाहीं. सृष्टींतही तशी समतेची लवलेश सूचना सांपडत नाहीं.

पुन्हा, अुंदरासाठीं अहिंसेच्या नांवें गांधीजी म्हणतात तसे ते स्वतः जरी मेले तरी फरक काय झाला ? अुंदराचा जीव वाचला तर गाधीजींचा जीव गेला. कोणाची तरी जीवहिंसा झालीच !

जीवाजीवांतच नव्हे, तर माणसामाणसातही जगण्यामरण्याचा विचार तारतम्यानें करावा लागतो ही गोष्ट प्रत्यक्ष गांधीजीही, निदान त्याच्या स्वतःवर बेतली म्हणजे, चांगले जाणून असतात. मी अुंदिराकरितां मरेन, मी मोटा सत्यवादी आहें, मी मोठा अहिंसक आहें, तुम्ही सारे हिंसक ! प्रभृति वाक्यें भोळ्याभाबड्या किंवा दीनदुबळ्या लोकावर छाप पाडण्याच्या कामीं गाधीजींच्या कितीही अुपयोगीं पडत असली, तथापि ते स्वतःच्या अंगावर बेतताच अनेक वेळा सारा दिखाअू वेदान्त गुंडाळून कसे बाजूस ठेवतात, हें अशा प्रसगीं स्पष्टपणें न सांगणें म्हणजे अुंदीर न मरावा म्हणून माणूस मरू देणाऱ्या भाबडेपणाचा रोग राष्ट्रात फैलावण्यास हातभार लावण्यासारखेच होणारें आहे. असली शिकवण किती अव्यवहारी आहे याचा, 'मी ती स्वतः अगदीं काटेकोरपणानें आचरतों' असें शपथेवर सांगणारेच कशी आचरूं शकत नाहीत हें दाखविण्यापेक्षां आणखी निर्विवाद पुरावा तो थोडक्यांत कोणता देता येणार ? तसा अेक दाखला हा पहा.

उंदीरभक्तीच्या या नव्या धर्मपथाप्रमाणें जर जीव तेवढा समान आहे आणि म्हणूनच अुंदरांना जगण्याचा माणसाअितकाच अधिकार जर आहे, तर शरिरात होणाऱ्या रोगाच्या कोणत्याही रोगाणूंनाही जगण्याचा अधिकार माणसाअुंदरांअितका असलाच पाहिजे. गांधीजींना अुदरांत अपेडिसायटिस नांवाचा असाच अेक भयंकर रोग झाला, तेव्हां हे रोगाणु, हे जीव, त्यांच्या रक्तामांसावर यथेच्छ ताव मारीत नी आम्ही दुधावर जगतो तसे घावांतील पुवावर जगत असत. त्या बापड्या चिमुकल्या जीवांची वसाहतची वसाहत गांधीजींच्या शरिरांत, ऑस्ट्रेलियांत अँग्लो-सॅक्सनांची वसाहत भरभराटली तशी, भरभराटत होती; त्यांचे जीव सुखानें नांदत होते. पण त्यायोगे महात्माजींचा जीव संकटांत पडतांच त्यांनीं शस्त्रवैद्य बोलावून ती रोगाणूंची वसाहतची वसाहत कत्तल केली ! अुंदीर मारून मी जगण्यापेक्षां मी स्वतःच मरेन म्हणून आपली शेखी मिरवणाऱ्यांनीं स्वतःच्या जिवासाठीं ते लाखो जीव कां कत्तल केले ? गांधीजींअितकाच त्या रोगपिंडांनाही जगण्याचा अधिकार होता !

• परंतु त्याहीपलीकडे जाऊन अशा थोतांडास कोणच्यातरी अेका अलौलिक सिद्धाअीसारखे समजून जेव्हा त्याचा राष्ट्रास प्रकट उपदेश होअूं लागतो, तेव्हां असें हडसून खडसून विचारणें सार्वजनिक कर्तव्य आहे कीं, "महात्माजी, आपण जर असे अगदीं अेकांतिक अहिंसावादी आहांत, तर आपणच लिहिल्याप्रमाणें जर्मन लोकांस मारण्यासाठीं सशस्त्र सैनिकांची भरती करण्याच्या कामीं थकून ताप येअीतों आपण वणवण कां हिंडलात ? केवळ अहिंसेच्या प्रश्नापुरतेंच बोलायचें तर काय अुंदरांनाच तेवढा जीव असतो आणि जर्मनांना नसतो ? "

फार काय, गाधीजींच्या बागेत अेकदां माकडांनीं फार अुपद्रव दिला नी सत्याच्या नांवें त्यांस हात जोडले तरी तीं माकडें गांधीजींच्या बागेतील फळफळावळ खाणें सोडीनात. तेव्हां गांधीजींनीं त्या माकडांची शक्य तितकी थोडी कां होअीना, पण हिंसा करून मारविण्यास प्रकटपणें नी तसें करणें अपरिहार्य असें सांगूनसवरून कंबर कसली होती ! मग काय, गाधीजींच्या बागेतल्या केळ्यांपेक्षां प्लेगमध्यें मरणाऱ्या त्या हजारों शेतकऱ्याचे जीव कमी मोलाचे होते ? केळ्यांच्या रक्षणासाठीं माकडांची हिंसा करणें अपरिहार्य म्हणून वैध; माणसांच्या जीवांस वांचविण्यासाठीं अुंदिरांची हिंसा अपरिहार्य असतांहि निषेधार्ह!! पण युक्तिवादाला टिकेल तर तो 'आंतला आवाज' कसला !

शांतता, सत्य, अहिंसा याच्या देवाल्यात पूजा करण्याचा मक्ता अेकट्या गांधीजींस मिळालेला नाहीं. प्राणपणानें आम्हींही त्याच देवतांची पूजा तितक्याच अेकनिष्ठतेनें करीत आलों आहोत, आणि जेव्हां जेव्हां त्या तत्त्वास प्रत्यक्ष आचरण्याचा प्रसंग येतो तेव्हां तेव्हां गांधीजींनाही त्यांच्या पोकळ नी भाकड व्याख्या बाजूस सारून त्या सद्गुणांच्या भरीव नी सत्यसृष्टीला धरून असणाऱ्या आमच्या व्याख्यांप्रमाणेंच त्यांचा वर्ताव करावा लागतो.

पण अुंदीर नी माणसें दोघेंही वांचविण्याची जी आणखी अेक अजब युक्ति त्यांनीं सुचविली आहे ती तर आजपर्यंतच्या अशा त्याच्या क्लृप्त्यांसच भाकडपणांतही मागें टाकणारी आहे.

ते म्हणतात, "अुंदीर मारण्यापेक्षां, अुदिरांची अुपजच बंद करावी ! हेंच व्रतास सुसंगत आहे ! "

पण जर अुंदरांना माणसाप्रमाणेंच जगायचा हक्क आहे, तर त्यांस माणसा-प्रमाणेंच प्रजननाचा नी वंशविस्ताराचाही हक्क आहेच! मग तो हिरावणारे तुम्ही कोण? काहीं अुंदीर मारणें जर हिंसा तर त्यांचा आमूलाग्र निर्वंश करणें, जातची जात अुच्छेदणें ही शतपटीनें अधिक भयंकर हिंसा नव्हे काय? माणुसकीच्याच मूल्य-मापनानें जर अुंदिरकी मापायची तर कोणचाही स्वराष्ट्राभिमानी अुंदीर असेंच म्हणणार कीं, "एक वेळ आमच्यांतले दहापाच हजार अुंदीर वीर ठार झाले तरी चालतील, पण आम्ही आमची अुंदीर जातची जात निर्वंश होअूं देणार नाहीं! आम्हांपैकीं क्वचित् प्रसंगीं सांगूनसवरून थोडेसे अुदीर ठार करणारा माणूस जर राक्षस होय, तर आमची जातची जात जन्मतःच असा केंसानें गळा कापून, न कळतां ठार करणारा शकुनि महाराक्षस समजला पाहिजे!"

आम्हां माणसांना संततीचें सुख जसें अत्यंत हवेंसें, आमच्या महिलांना वात्सल्याचा पान्हा जसा अुत्कट आनंद देतो, तसेंच अुंदरानाही आपल्या चिल्या-पिल्याच्या वत्सलतेची माधुरी चाखण्याची हौस असणारच. सारी सृष्टि ज्या प्रज-ननाच्या लालसेनें विमोहित, त्याच लालसेनें अुदीरही व्याकुळ असणारच. मग त्यास ह्या वत्सलतेच्या आस्वादास आचविणें, ती जातची जात खच्ची करून त्यांचें निःसंतान करणें ही तेवढीच हिंसा होय कीं, जेवढी अेखादें राष्ट्रचें राष्ट्र पूर्वीचे विजेते खच्ची करीत तेव्हा त्याच्या हातून घडे!

आणि पुन्हा, अुदिरांची अुपजच बंद करायची कशी? प्रत्येक अुंदराअुंदरीस हिटलरच्या खच्चीकरण-कार्यालयात धाडून? का कर्व्यांच्या संततिनियामक व्याख्या-नांस अेकवून? का संततिनियमनाचीं साधनें पुरवून?

# सहावा किरण

## जगांतील यच्चायवत् युद्धें अशक्य करून टाकणारा अलौकिक शास्त्रीय शोध !

घ्या ! तुमच्या अमेरिकेची अेवढी घमेंड हवी कशाला ! काय म्हणे आगगाडी, तारायंत्र, बिनतार, विमान, ध्वनिलेख, ध्वनिक्षेप ( ब्रॉडकॉस्ट ) प्रभृति प्रकल्प (inventions) नी शोध युरोप-अमेरिकेनें लावले ! ह्या थोड्याशा अुथळ प्रकल्पांसरशीं काय ते पाश्चिमात्य लोक फुगून गेले ! जणूं काय त्यांनाच असे शोध लावतां येतात आणि आम्हां भारतीयास मुळींच लावतां येत नाहींत ! मोडलें शेवटीं त्यांच्या त्या घमेंडीचें कंबरडेंच ! कारण आमच्या कामकोटीच्या शकराचार्योंनीं गेल्या महिन्यांत युरोप-अमेरिकेला त्याच्या बापजन्मीही कधीं सुचला नाहीं असा अेक अलौकिक शोध लावला आहे !

भारतीयांनींही अगदीं या पडत्या काळांतील कांहीं वैज्ञानिक शोध लावले होते. भिसे, बोस यानीं युरोपिअन लोकांतही बोलबाला व्हावा असे काहीं यात्रिक प्रकल्प नी वैज्ञानिक शोध लावले खरे; पण ते अितके अलौकिक नव्हते कीं ज्यायोगें युरोपियन तर काय, पण अेकंदर मागचीपुढची मानवी बुद्धीच चकित होअून जावी ! ब्रह्मदेवाचा गर्व अुतरण्यासाठी प्रतिसृष्टि निर्मितों म्हणून प्रतिज्ञापून

---

मनोहर मासिक, ऑगस्ट १९३५

विश्वामित्रानें ब्रह्मदेवी माणसाची प्रतिसृष्टि म्हणून माकड, ब्रह्मदेवी घोड्याचा प्रतिस्पर्धी म्हणून गाढव, अित्यादि पदार्थ निर्मून पूर्वी अेकदा जी तोडीस तोड अुडवून दिल्याचें पुराणें सागतात, तेव्हांपासून आजवर साऱ्या जगाची आगगाडी अेकदम कळ दाबताच या रुळावरची त्या रुळावर नेणारा असा अद्भुत शोध कोणी लावला नव्हता ! आमच्या कामकोटीच्या शंकराचार्यांनीं तसला अपूर्व शोध लावून आम्हां भारतीयाचें नांव पुन्हा अुजळलें ! युरोपचें नाकच्च कापलें !

आणि त्या प्रकल्पाचा विषय तरी किती गहन ! अेकादा सटरफटर विमानाचा प्रकल्प नव्हे तो. मनुष्य म्हणे युरोपात अुडूं लागला ! त्यांत रे काय ? कावळादेखील अुडत होताच कीं ! काय म्हणे बोलपटाचा शोध ! आचरटपणा वाढविलात; दुसरें काय केलेंत ! अतिदर्शनयंत्र काढलें—television काढलें ! घार नाहीं का मैल-मैल अुंचीवरून भूमीवरचा किडा पहात ! असले शोध पैसापासरी पडले आहेत ! पण जो शोध माणसाला तर काय, पण देवांनाही कधीं लावता आला नाहीं असा शोध लावावा तर तो आमच्या कामकोटीच्या शंकराचार्योनींच ! देवांना देखील जीं थांबवितां आली नाहींत तीं युद्धेच मुळीं बंद पाडण्याचा, केवळ अशक्य करून टाकण्याचा तो शोध शेवटीं आम्हीं भारतीयानीं गेल्या महिन्यात लावला !

तो अत्युद्भुत शोध, पाटणा येथील प्रवचनांत श्रीमच्छंकराचार्य ( कामकोटी ) ह्यांनीं परमकृपाळूपणें आपल्या शिष्यगणास अुपदेशितांना प्रकटविला—कीं, जर मनुष्यांस युद्धे अशक्य करून सोडायचीं असतील, देवांनाही साधलें नाहीं तें साधायचें असेल, तर—आहे ! त्या अति दुर्घट साध्यासहि साधणारा अुपाय आहे. केवळ अेक नियम सर्व मनुष्यांनी पाळला पाहिजे, तो हा कीं—

"पक्व फळें नी गायीचें दूध हें अन्न जगांतील सर्व मनुष्यांनीं सेवावें. या अन्नामुळें सत्त्वगुण वाढेल. सत्त्वगुण वाढताच युद्ध करण्याची मनुष्याची प्रवृत्तीच नाहींशी होअील." प्रवृत्तीच नाहींशी झाली कीं, युद्धच काय, पण युद्ध हा शब्दसुद्धां मानवी कोशांतूनच नव्हे तर मनांतूनही नामशेष होअील हें निर्विवादच आहे.

घ्या म्हणावें आतां त्या युरोपियनांना ! आम्हां हिंदु लोकांस निःशस्त्र करून ठेवलेंत काय ! आणि तिकडे आपण मात्र लाखों मशिनगन्स, तोफा, टॉर्पेडो, चिलखती सशस्त्र मोटारी, विमानें, स्फोटक दारूचीं नी बॉम्बचीं लक्षावधि भयंकर

कोठारेंच्या कोठारें जय्यत ठेवलींत आणि येतांजातां बायोनेटीकडे बोट दाखवून आम्हांस भिववीत होतांत काय ! काढला अुपाय बघा आम्हींही त्यावर ! तुमची युद्ध करण्याची प्रवृत्तीच मारून टाकतों आता ! पक्व फळें नी गायीचें दूध, तुम्हांस खावयास लावलें कीं, जिरलीच तुमची रग ! त्या दारूच्या, बॉम्बच्या नी विषारी धुरांच्या बळावर माजलां होतात नाहीं ? अरे, पण तुमचे हे सारे स्फोटक नी मारक शोध अुभारलेले असणार ह्या टुक्कार रसायनाच्या अधिष्ठानावरच काय ते; पण आमचा हा शोध अुभारलेला आहे त्या भरभक्कम अीश्वराच्या अधिष्ठानावर ! 'परंतु तेथें अीश्वराचें ! अधिष्ठान पाहिजे !' सत्त्वगुण पाहिजे ! हें विसरलांत तुम्हीं ! !

यावर कोणी युरोपिअन विचारील कीं, पक्व फळें नी गायीचें दुध हें युरोपियनांस खाणें तुम्ही भाग कसें पाडणार कीं ज्यायोगे युद्धें करण्याची प्रवृत्तीच लुळी व्हावी ? मागें अेकदां माजरांच्या युद्ध करण्याच्या प्रवृत्तीपासून अुंदीर जातीस बचावण्यासाठीं अुदिरांतील अेका विचारी पुरुषानें जेव्हां अशीच अक बिनतोड युक्ति काढली होती कीं, घंटा बांधा त्या मांजराच्या गळ्यात, तेव्हां सुद्धां अेका सशयात्मा अुंदरानें अशीच अेक शंका काढून त्याचा हुरूपमोड केला होता कीं, 'घंटा बांधावी हें खरें, पण ती कशी ? कोणीं ?' तो प्रश्न अुंदरांना जरी अजून सोडवितां आला नाहीं, तरी पक्व फळें नी गायीचें दूध भाडकुदळ माणसांना खाणें भाग कसें पाडावयाचें हा प्रश्न आम्हां भारतीयांना तरी सहज सोडवितां येणारा आहे, हें ह्या शोधाची चेष्टा करणाऱ्या युरोपियनांनीं खूप समजून असावें ! पक्व फळें नी गायीचें दूध हें त्यानीं आपण होअून न खाता, जरी त्यांच्या त्या प्रचंड तोफाच्या रणतरींसह अेक लाख बायोनेटें घेअून हिंदुस्थानवर चढायी केली, तरी आमच्या किनाऱ्यावर पाअूल ठेवताच आम्ही रबराच्या प्रचंड नळ्यातून गायीच्या दुधाचा त्यांच्या तोंडावर असा नुसता धुवांधार पाअूस पाडूं कीं, त्यांच्या नाकातोंडात श्वास घेतां घेतां ते हंडेचे हंडे घुसलेच पाहिजेत, आणि पक्व फळांची अशी सारखी गोलंदाजी चालवूं कीं, तोंड मटन खायला जरी अुघडलें तरी आमचीं पक्व फळें त्याच्या तोंडात पडलीच पाहिजेत ! मग बघूं या त्याच्यांत सत्त्वगुण कसा संचारत नाहीं ! युद्धाची प्रवृत्तीच नाहींशी होअून ते साष्टांग नमस्कार घालूं लागतील नमस्कार ! !

पक्व फळें नी गायीचें दूध हें अन्न जर मनुष्यमात्र सेवील तर सत्त्वगुणाचा

अपरंपार अुत्कर्ष होअून मनुष्याची युद्ध करण्याची प्रवृत्तीच बंद पडेल. ह्या जगांतील युद्धें आमूलात् थांबविण्याच्या वरील अत्युद्भुत शोधासंबधीं दोनचार आणखीही शंका कांहीं संशयात्मे काढण्यास सोडणार नाहींत हें आम्ही जाणून आहोंत. कारण आजकाल मनुष्याची धर्मप्रवृत्ति आणि श्रद्धा हे दोन सद्गुण नाहींसे होत चाललेले आहेत. त्या शंकांस निर्दळण्यास कामकोटीचे शंकराचार्य समर्थच आहेत म्हणा; पण तशा संशयात्म्यांस कसें निरुत्तर करावें हें जर आमच्यासारख्या समस्त श्रद्धाळू शिष्यवर्गासही समजलें तर आम्ही त्या सशयात्म्यांचीं तोडें परस्परच बंद पाडूं. त्यासाठीं आम्ही त्या शंका थोडक्यांत सागत आहोंत. आचार्य कृपाळू होअून त्यांचीं उत्तरें कशीं द्यावीं तें आम्हाला प्रसिद्धपणें सांगतील अशी आशा आहे.

गायीचें दूध नी पक्व फळें हीं दोन्हीही अन्नें सत्त्वगुणी असलीं तरी त्यांतल्या त्यांत भांडखोर प्रवृत्ति गायीच्या दुधापेक्षाही पक्व फळात कमी असली पाहिजे हें अुघड आहे. कारण गायीच्या हृदयाच्या सात्त्विक गयाळपणाचा गुण तिच्या दुधांत अुतरतो तसाच शिंगांच्या अणकुचीदार मारकपणाचा दोषही त्या गायीच्या दुधांत अुतरत असावेंसें वाटणें क्षम्य आहे. अेवढ्याचसाठीं बैल अगदीं पहिल्या दिवसापासून निव्वळ गायीच्याच सात्त्विक दुधावर वाढत असतांही मोटा मारकुटा प्राणी म्हणून वेदांत देखील संकीर्तलेला आहे. तेव्हां मनुष्याला अगदीं अुपजल्या दिवसापासून जरी आअीच्या दुधाचा थेंबही पिअूं न देतां गायीच्याच सडावर पोसला गेला तरीही त्याच्यांत निदान बैलाइतका तरी शिंगाळ मारकेपणा येणारच! सात्त्विक देवता जी गाय ती गायच जर लाथा झाडते, फुस्कारते, आणि अुपद्रव होतांच शक्य तों शिंगावर घेण्यास सोडीत नाहीं, तर बैलाची गोष्टच नको! बोलून चालून बैलच तो!

बरें, गायीच्या दुधाचा सात्त्विकपरिणाम बैलावर जरी न झाला तरी माणसावर होअीलच असें म्हणावें तर अगदीं गायीच्या दूध-दहीं-लोणी-तुपावरच परिपुष्ट झालेले गोकुळींचे भगवान् बालकृष्णही मारकुटेपणांत राक्षसांचेही बालवयांतच काळ झालेलें होते. आम्ही, अठरा अक्षौहिणी मारविणाऱ्या भारतीय युद्धाचा तो मूर्तिमंत रणगंभीर रणोत्सव जो सुदर्शनधारी प्रौढ श्रीकृष्ण त्याची कथा अुल्लेखित नाहीं. कारण युद्धाची ती अदम्य झुझार प्रवृत्ति प्रौढ श्रीकृष्णात ते मोठेपणीं क्षत्रियास अुक्त तें मांस नी मद्य सेवूं लागल्यापासूनच आली असें म्हणतां येअील. श्रीकृष्ण मांस, मद्य सेवीत हे भारतांत स्पष्टच वर्णिलें आहे. पण आम्ही बाल-

कृष्णापुरतेंच बोलतों आहोंत. बाळकृष्ण तरी दहीं, दूध, लोणीच आकंठ सेवीत; पण धर राक्षस कीं चुरड ही त्यांची पराक्रमी प्रवृत्ति त्या गायीच्या दुधाच्या चरबींत बुडाल्याचें केव्हांही आढळलें नाहीं. गोकुळींच्या गायींच्या दुधांत रवि घुसळतांच दुर्धर्ष पराक्रमाचेंच लोणी निघे—गयाळ, मवाळ, नी आततायीची खोडकी जिरविणाऱ्या युद्धाची प्रवृत्ति सुद्धा नष्टविणाऱ्या मुर्दाड सात्त्विकपणाचें नव्हे. त्या गायीच्या दुधावरच वाढले म्हणून बालकृष्ण राक्षसाचें कंबरडें मोडण्यांत अितके झुंझार नी बळवान झाले, असें गोरक्षकच अट्टाहासानें प्रतिपादितात! अितके झुंझार कीं ओठांवरील त्या गायीचें दूध सुकतें न सुकतें तोंच मथुरेला जाअून बळेंबळें भाडण काढून कंसाचें डोकें भर रंगणांत छाटून काढावें! रक्ताचा पाऊस पाडून अुन्मत्त वृषभासारख्या डुरकाळ्या फोडीत रंगणांत दंड थोपटीत अुभें ठाकावें! गायीच्या दुधानें जो अंगी येतो, तो सत्त्वगुण असा असतो—युद्धाची प्रवृत्तीच मारून टाकणारा नसतो!

हां, क्वचित् असें असण्याचा संभव आहे कीं, त्या देवपालित, प्रभुलालित, गोकुळींच्या तुद गायींचें दूध आजच्या या पांजरपोळी मरतुकड्या गायींच्या दुधाअितकें गयाळ सात्त्विकपणास पोषक नसावें! म्हणून गोकुळींच्या गायींच्या दुधानें बाळकृष्ण जरी मारकुटे झाले तरी ह्या पाजरपोळी गायींच्या दुधाचें सेवन केलें असतां आपल्या अंगों मात्र मारखाअू सात्त्विकपणा ओतप्रोत मुसमुसून युद्धाची प्रवृत्तिच नाहींशी होअील!

गायीला शिंगें असल्यामुळें तिच्या दुधांत थोडातरी मारकुटेपणा, युद्धाची प्रवृत्ति, असणें अपरिहार्य असें मानलें, तरी देखील आचार्यांनीं दुसरें अन्न जें सात्त्विक गुणाचा प्रकर्ष करणारें म्हणून सागितलें आहे त्याविषयीं मात्र कांहींच शंका घेण्याचें कारण नाहीं. वृक्षांना शिंगें नाहींत, गायीसारख्या लाथा झाडण्याची खोडही त्यांस नाहीं, तेव्हां वृक्षांच्या पक्व फळात सात्त्विक गुण अगदीं निर्भेळ असा सांपडणें अनिवार्यच आहे. तेव्हां पक्व फळें खाल्ल्यानें मनुष्यांत सात्त्विक गुण अुत्कर्षून त्याची समरांगणातील युद्धाचीच नव्हे, तर नुसत्या स्वयपाकघरांतील बोंचकारण्याची फार काय, खेळकर नाक खाजविण्याची सुद्धां प्रवृत्तीच मारली जाअील हें अगदीं खरें आहे. त्याला तसा प्रयोग यशस्वी झाल्याचा प्रत्यक्ष वैज्ञानिक पुरावाही आहे—माकडांचा! तीं बिचारी माकडजात अितकी सात्त्विक नी युद्धाची प्रवृत्तीसुद्धां लेशमात्र ज्याच्यांत आढळत नाहीं अशी कां झाली? माकडानें असेंच कोणास

चिडविण्याकरितां नाक खाजविलें, किंवा अयोध्या-त्र्यंबकेश्वर प्रभृति हजारों माकडें असलेल्या क्षेत्रांत बायाबापड्या दर्शनास येतांच त्यांचे कुंकवाचे करंडेच पळीव, वेडींवांकडीं तोंडें करून भेडसाव, मुलास पळवून ने, चिडवितांच खाड्‌किनी डस, आपसात दगड अुचलून, झाडाच्या फांद्या घेऊन मारामाऱ्या कर, दुकानावर अकस्मात् झडप घालून फुटाणे लूट, निजलेल्यांच्या पागोट्याचे सोगे ओढीत झाडावर चढवून खिदिखिदी हास—असे कोणतेही खोडकर चाळे, प्राणघेत्या झोंब्या, रक्ताळ बोचकारेबोचकाऱ्या करताना माकडांस कोणी कधींतरी पाहिलें आहे ? ओरांग-ओस्यांग, शिंपान्झी, बेबून प्रभृति प्रचंड वानर-माकडांच्या लढाया सैन्येंच्या सैन्यें जमवून निबिड अरण्यात चालतात म्हणून प्रवासी म्हणतात तेंही खोटें असलेंच पाहिजे. माकडात हा जो सत्त्वगुणाचा प्रकर्ष झालेला आहे, तो निःसशय या अेकाच गोष्टीनें असणार कीं, माकडें-वानरें याचा आहार जवळ जवळ सर्वस्वी पक्व फळाचाच असतो. त्यांची जन्माचीच अेकादशी शुद्ध नी अक्षरशः फलाहारच—फराळ ! म्हणूनच तीं सात्त्विक झाली, युद्धाची प्रवृत्तिच त्यांच्यांत अुरली नाहीं ! होय ना ? यास्तव हे मनुष्या, पक्व फळें नी गायीचें दूध तूं सेव, कीं तुझ्यांत सत्त्व अुगवेल ! सत्त्वाचा हंगाम अुगवला कीं युद्धाची प्रवृत्तीच नष्टेल ! युद्धाची प्रवृत्तीच नष्टिली कीं जगातून युद्ध नामशेष झालेंच पाहिजे ! सशस्त्र लोकांची रग जिरविण्यास निःशस्त्र लोकास हा अत्युद्‌भुत शोध म्हणजे केवळ संजीवनीच सापडली ! केवळ पक्व फळें नी गायीचें दूध स्वतः खाल्लें नी दुसऱ्यास खावविलें कीं आटोपलें ! !

## हा झाला युद्धें नाहींशीं करण्याचा अद्‌भुत अुपाय ! आतां भूकंप नाहींसा करण्याचा तितकाच अद्‌भुत अुपाय अैका !

कामकोटीच्या शंकराचार्यांनीं युद्धाच्या आपत्तीपासून मनुष्य जातीस वरील अुपाय शोधला न शोधला तोंच भूकंपापासूनही मनुष्यास वाचविण्याचा अेक अद्‌भुत अुपाय महात्मा गांधीजींनीं शोधून काढला आहे.

भूकंपाच्या सगळ्याच विषयाचा त्यांनीं फार खोल अभ्यास केलेला दिसतो. युरोप—अमेरिकेंतही भूकंप विषयाचा पुष्कळ वैज्ञानिक अभ्यास करीत आहेत. साधारणतः भूकंपाचें नक्की भविष्य ग्रहणाइतकें अचूक जरी अजून विज्ञानास सांगतां आलें नाहीं तरी भूकंपाचे सूक्ष्म धक्के आगाअू दूरवर कळविणारीं यंत्रे

ग्रसींच कार्यक्षम अशीं निघालीं आहेत. आज ना ग्रहणाचे नियम जसे आगाअू आणि नक्की गणिताच्या पकडींत मनुष्यानें पकडले आहेत तसेच भूकंपाचे पकडून ठेवतां येतील, त्याचीं कारणें, वेळा, गति, स्थानें निश्चितपणें वर्तवितां येतील, असा वैज्ञानिक जगांत विश्वास वाटत आहे. आणि प्रत्येक भूकंप होतांच तिथें जाअून मागच्या भूकंपाच्या तारखांशीं, स्थानांशीं, ग्रहवेधाशीं, भूगर्भाशीं, गतीशीं त्याचें सादृश्यासादृश्य तुळून जुळून सामान्य नियम असे काय काय शोधतां येतात तें अवलोकिलें जातें. आकाशातील ग्रहोपग्रहांच्या स्थितिगतींचें अवलोकन करता करतां जसे सूर्य-चंद्र-ग्रहगती ग्रहणांचे नियम सापडले तशाच प्रक्रियेनें भूगर्भाचेंही हृद्गत मनुष्यास कळून ज्वालामुखी नी भूकंप ह्यांसारख्या अद्याप मनुष्याच्या ज्ञानाच्या आटोक्यात न आलेल्या अुत्पातांचीही नाडी मनुष्याच्या हातीं गवसेल अशा अपेक्षेंत आंकडेमोडी जडवादी भौतिक वैज्ञानिक जों प्रयोगावर प्रयोग करण्यांत धडपडत आहेत तोंच—

गांधीजींनीं केवळ सत्त्वगुणसंपन्न अंतःस्फूर्तीच्या बळें तो सारा प्रश्न चुटकीसरसा सोडवून टाकला! आतां भूकंपाविषयीं तरी 'तज्ज्ञात्वा नेह भूयोन्यद् ज्ञातव्यमवशिष्यते!' त्या प्रकरणीं जे काय सागण्यासारखे तें गांधीजींनीं सर्व सागून टाकलें आहे.

ती गांधीजीप्रणीत भूकंपविद्या थोडक्यांत अशी : (१) भूकंप का होतात? देव रागावतो म्हणून. (२) देव कां रागावतो? मनुष्य पाप करतो म्हणून. (३) कोणाच्या पापानें कुठें भूकंप होतो? अस्पृश्यांना गुरुवायूरचें देअूळ मद्रास प्रांतामध्यें अुघडलें नाहीं तर बिहार प्रातांत भूकंप होतो. देवच नाहीं म्हणावयाचें महापाप रशियांत वा हिमालयीन चुक्यांचें पाप वर्ध्याला केलें तर क्वेट्ट्याला भूकंप होतो!! अितर सागोपांग टांचणें नि कोष्टक श्रद्धाळू शिष्य जसजसें प्रश्नतील तसतसें प्रसिद्धिलें जाअील. (४) भूकंपावर रामबाण अुपाय कोणता? प्रार्थना!

पाहिलेंत ना सत्त्वगुणाचा अुदय मनुष्यात होअूं लागला कीं त्याला चराचर सृष्टीचीं सारीं गौप्यें अंतःस्फूर्तीच्या अेका चमकेंत कशीं स्पष्टपणें प्रतीत होतात! किती समंजस हा कार्यकारणभाव! किती सात्त्विक हें ज्ञान! अुगीच नाहीं कामकोटीच्या शंकराचार्यांनीं म्हटलें कीं, पक्व फळें नी गायीचें दूध खाल्लें कीं सत्त्वगुणाचा अुदय

अंतःकरणात झालाच पाहिजे! पक्व फळें नी गायीचें नसलें तरी बकरीचें-दूध गांधीजी अुगीच सेवीत नाहींत! सृष्टीचीं भौगोलिक हृद्‌गतें अितकीं अचूक जाणविणारा प्रकाशशील सत्त्वगुण अन्यथा कसला प्रकटणार!

भूकंपविद्येचीं हीं गौप्यें अचूक आहेत हें तरी कशावरून? अशी कुशंका जर कुणास येअील, तर त्या सत्त्वगुणाच्या स्वयंप्रकाशी प्रज्ञेच्या बळावर अितर साधु पुरुषानीं सृष्टीचीं अशींच आणखी कांहीं गौप्यें जीं आजवर सांगितलीं आहेत तीं पडताळून पाहावींत, म्हणजे ती कुशंका निरस्त झाल्यावाचून केहांही रहाणार नाहीं. वरील भूकंप प्रकरणातील शोधाच्या तोडीस तोड देणारे हे खालील सात्त्विक शोध पहा :

( १ ) आकाशांत पावसाच्या भगांत गडगडतें कां? देवांची सासू तिच्या प्रचंड जात्यात हरबरे भरडते आहे म्हणून. ( २ ) महामारीची सांथ कां आली? मरीआअीला कोंबडी दिली नाहीं म्हणून. ( ३ ) प्लेग ह्या वर्षी गावात कां आला? बहिरोबाला गेल्या वर्षी बारा बोकडाचे बळी दिले नाहींत म्हणून. ( ४ ) समुद्र खारट कां? अगस्ति ऋषीनें त्यात लघुशका केली म्हणून. ( ५ ) देवानें चंद्र कां अुत्पन्न केला? मुसल्मानाना निमाजाच्या नी रोजाच्या वेळा कळाव्या म्हणून! ( ६ ) पंचगव्य प्रत्यहीं का प्यावें? तें सर्वरोगप्रतिबंधक आहे म्हणून. ( ७ ) पंचगव्य सर्व-रोगप्रतिबंधक आहे याला आधार काय? वैद्यक शास्त्रावरील अत्यंत प्रमाणभूत नी प्रयोगसिद्ध ग्रंथ जो गुरुचरित्र त्यात सांगितलें आहे म्हणून. ( ८ ) सारें युरोप, आशिया, अमेरिका, हिंदी मुसल्मान, ख्रिश्चन, तें रोगप्रतिहारक पंचगव्य जन्मांत कधींही पीत नसतां रोगानें पटापट मरत का नाहींत? पंचगव्यावर त्यांची श्रद्धा नाहीं म्हणून. ( १० ) हिंदु लोक जन्मभर पंचगव्य पीत असतांही देवी, महामारी, प्लेग, क्षय प्रभृति रोगांस युरोपियनापेक्षाही अत्यंत अधिक प्रमाणात बळी कां पडतात? पचगव्य हें रोगप्रतिबंधक आहे असें गुरुचरित्रांत सागितलें असतांही, जन्मभर पितां पितां अेखादे दिवशीं तरी पंचगव्य पिण्याला विसरतात म्हणून!

परंतु वरील सर्व शोधांवर कडी करणारा आणि युरोपच्या प्रकल्पक शक्तीचें (Inventive Genius चें) रेकॉर्डच मोडून टाकणारा शोध जर कोणाचा असेल तर तो श्री. चौंडेबुवांचा होय. प्रत्येक फुटकळ फुटकळ अरिष्टावर वा रोगावर काय तो अेकेक अुपाय आजपर्यंतच्या संशोधकानीं नी प्रकल्पकांनीं

काढला. कोणी प्लेगावर, कोणी देवीवर, कामकोटीच्या शंकराचार्यांनीं युद्धाचें अेक अरिष्ट नामशेष करणारा, महात्माजींनीं भूकंपाचें अरिष्ट नामशेषविणारा; पण झाडूच्या अेका झपाट्यासरशीं सारेचे सारे जलमट जसे आपण झाडून टाकतो तशीं या दुर्दैवी भारतावरचीं सारींच्या सारीं अरिष्टें अेका फटकाऱ्यासरशीं लंबी करून टाकण्याचा अत्यद्भुत शोध साधुशील श्री. चौंडेबुवांनीं लावला! गोरक्षक—नव्हे, चुकलों! ( मनुष्यानें रक्षावी अशी गो म्हणजे कोणी दुबळा पशु आहे असा त्याचा अर्थ होअून त्या गो देवीची विटंबना होते; यास्तव मनुष्यानें जिची सेवा करावी अशा त्या गोदेवतेचे—) गोसेवक चौंडेबुवा ह्यानीं अगदीं अलीकडेच प्रतिज्ञेवर अुद्घोषिलें आहे कीं, जर आम्ही भारतीय लोक त्रयोदशाक्षरी दिव्य मंत्राच्या, सगळे मिळून कां होअीना, पण अेक कोटी जपाची संख्या भरून देअूं तर ऽऽ—तर काय? अहो, सर्वारिष्टशांति होअील, सारींचीं सारीं अरिष्टें अकस्मात् नाहींशीं होतील. प्लेगनें पिसू देखील मरेनाशी होईल. भूगर्भातील पंचभूतांची सारी अव्यवस्था नि ढकलाढकली नाहींशी होअून भूकंप असा होणार नाहीं. गेल्या दोन्ही भूकंपांतील पडलेलीं लाखों घरें, देवळें पुन्हा आपलीं आपण होअून अुभारलेलीं दिसतील. शेतकरी ऋणापासून, साखरेचे कारखाने जकातीपासून, मिठागरें करांपासून, माणसें ढेंकणापासून नी गायी गोचिडापासून मुक्त होतील. ज्वालामुखी थंड होतील, चुलीवांचून दुधें साय येअीतों तापतील. कोणी आजारी पडणार नाहीं, कोणी मरणार नाहीं. दुष्काळ, दारिद्र्य, पारतंत्र्य, पांजरपोळ—अरिष्टं तितुकें नष्टे. केवळ बसल्या बसल्या 'श्रीराम जयराम जयजयराम' हा त्रयोदशाक्षरी मंत्र अेक कोटी संख्या सगळ्यांनीं मिळून जपला गेला कीं झालें! त्या जपास मोजण्यासाठीं माळा देखील श्री. चौंडेमहाराज चहूंकडे पुरवीत आहेत!

खरोखर, आजपर्यंतच्या साऱ्या प्रकल्पांत नी संशोधनांत या चौंडेबुवांच्या शोधानें अुच्चांक ( रेकॉर्ड ) पटकाविला आहे! आजपर्यंत संशोधनाच्या चढाओढींत युरोपनें लेला रेकॉर्ड,—पटकावलेला अुच्चांक—मोडून टाकला!

### अुच्चांक म्हणजे रेकॉर्ड

ओघांतच आलें यास्तव या 'अुच्चांक' शब्दाचें बारसें अिथेंच साजरें करूं. भाषाशुद्धीच्या आंदोलनानें महाराष्ट्रापुरती तरी शिक्षित जनतेची प्रवृत्तीच पुष्कळ अंशीं बदलून टाकून लिखित भाषेंत तरी शक्य तों अनवश्यक परकी शब्द निदान

यापुढें येअूं द्यावयाचा नाहीं, असा पुष्कळ जणांचा निश्चय होत आहे, ही समाधानाची गोष्ट आहे. या विषयाचा अुहापोह सारखा चालू ठेवून नवे नवे शब्द सुचवीत राहिलें पाहिजे. जे गुणांनीं टिकतील ते जगतील. या हेतूनें आम्ही मधून मधून या विभागांत तसा प्रघात चालू ठेवणार आहोंत. आज ओघानेंच आलेला हा अुच्चांक शब्दच चर्चेला घेअू.

अमक्यानें पोहण्यांत आजपर्यंतचा रेकॉर्ड मोडला, कुणी धांवण्यांत रेकॉर्ड पटकविला, असे प्रयोग वृत्तपत्रांतून नी बोलण्यांतून प्रत्यहीं येअूं लागले आहेत. या वेळींच नवीन स्वकीय तदर्थक शब्द प्रचारला तर तो तोडी बसेल, नाहींतर पांच-पंचवीस वर्षांत हा 'रेकॉर्ड' शब्द मराठींत खेडवळापर्यंत नित्याचा रुळून कांहीं केल्या निघणार नाहीं. मराठींत तर काय, पण सबंध हिंदुस्थानांतील भाषात रेकॉर्डला स्वकीय शब्द रूढ नाहीं ! पण आपण काढला नी रूढविला तर सगळे घेतील. हुतात्मा, जुळारी (compositor), विश्वस्त (trusty), स्तंभ (column), अग्रावत, बोलपट, विधिमंडळ असे कितीतरी शब्द गेल्या सहा सात वर्षांत मराठींत आम्ही रूढवितांच हिंदुस्थानभर फैलाविले. रेकॉर्डच्या प्रतिशब्दाची ही अुणीव सर्वांस तशीच भासत आहे. म्हणून रेकॉर्डला, प्रवीणतेंतील जास्तींत जास्त अंक या अर्थी, 'अुच्चांक' हा शब्द आम्ही सुचवीत आहोंत.

अमक्यानें धांवण्यांत जगांतील 'अुच्चाक' पटकाविला म्हणजे रेकॉर्ड केला; आणि अमक्यानें पोहण्यांत आजपर्यंतचा 'रेकॉर्ड' मोडला म्हणजे अुच्चांक मोडला.

कोणचाही शब्द कितीही बोधक असला तरी रूढविल्यावांचून कानास नी मनास चपखल भासत नाहीं. अुलट टाकाअू अर्धवट अर्थाचा शब्द देखील अेकाद्या अर्थी वापरीत गेलें, रूढविला कीं समर्पक वाटूं लागतो. रेकॉर्ड हा अिंग्रजी शब्दच घ्या. किती गोंधळ्या आहे पहा ! रेकॉर्ड म्हणजे नोंदीचें दप्तर; रेकॉर्ड म्हणजे ध्वनिलेखाची तबकडी—जसें बालगंधर्वाचें रेकॉर्ड म्हणजे त्याच्या गाण्याची फोनो प्लेट; रेकॉर्ड म्हणजे प्रवीणतेंतील पहिला क्रमाक. असे तीन भिन्न अर्थ. रेकॉर्ड मोडलें म्हणजे ती फोनो प्लेट फुटली, कीं रेकॉर्ड ऑफिसांतील फळी कोसळली, कीं पहिला क्रमांक छिनावला गेला ? पण रूढीनें संदर्भाप्रमाणें अर्थ चटकन् ध्यानांत येतो अितकेंच. तसेंच वरील अर्थी रेकॉर्डचा 'अुच्चांक' शब्द राखून ठेवून त्याच अर्थी वापरीत गेही कीं, तोही त्या अर्थी अगदीं चपखल बसूं लागेल, अगदीं तोच भाव व्यक्तवील.

## कायदा म्हणजे निर्बंध

या अंकापुरता दुसरा शब्द जो आम्ही वाचकांपुढें प्रामुख्यानें धरूं अिच्छितों तो 'निर्बंध' हा होय ! निर्बंध म्हणजे कायदा. ही अगदीं आम्हास लाजिरवाणी गोष्ट आहे नव्हे काय कीं, आपल्या कोणत्याही हिंदु भाषासंघांत-बंगाली ते तामीलपर्यंत- 'कायदा' ( Law ) ह्या समाजाच्या अस्तित्वाचा पायाच असलेल्या पदार्थास स्वकीय शब्द अुरला नाहीं ! जणूं काय मुसल्मान हिंदुस्थानांत येअीतों आम्हां हिंदूंस कायदा असा पदार्थच माहीत नव्हता, केवळ रानटी कळप काय ते या देशांत वावरत ! सगळ्या मनुष्य जातींतील आज अुपलब्ध असा आद्य नी महत्तम धर्मकार ( Law giver ) जे मनु भगवान ते ज्या भारतीयांचे धर्मकार ( Law giver ), त्यांच्यांतच Law ला स्वतःचा शब्द देखील अुरूं नये ! ही लज्जेची जाणीव कायदा शब्द अुच्चारतांच मनांत सुरीसारखी बोचली पाहिजे. यास्तव कायदा ( Law ) ह्या परकी शब्दाच्या ठायीं 'निर्बंध' हाच शब्द वापरावा. गेलीं चार अेक वर्षे कित्येक लेखक नी संस्था तो वापरीत आहेत. कायदा या शब्दाचे जे धेडगुजरी समास आज ऐकताच वीट आणतात त्यापेक्षा ह्या निर्बंध शब्दाचीं रूपें नी समास किती हृद्य लागतात तें पहा :

कायदा – निर्बंध
कायदेशीर – नैर्बंधिक
कायदेशास्त्र – निर्बंधशास्त्र
कायदेपंडित – निर्बंधपंडित
बेकायदेशीर – अनैर्बंधिक
कायदेविभाग – निर्बंधविभाग

# सातवा किरण

## रशियांतील घटस्फोट–स्वातंत्र्याचा प्रयोग

रशियामध्यें बोल्शेव्हिक क्रांति झाल्यावर जी उलाढाल झाली, ती कांहीं इतर अनेक क्रांत्यांप्रमाणें केवळ राजकीय स्वरूपाचीच काय ती नव्हती. किंवा इतर अनेक सामाजिक वा धार्मिक क्रांत्यांप्रमाणें निव्वळ धार्मिक वा सामाजिक कक्षेतच काय ती सामावलेली नव्हती. तिचे आनुवंशिक परिणामच नव्हेत तर तिचा हेतूच, तिचें सुस्पष्ट ध्येयच, मुळापासून मनुष्यसमाजाची रचनाची रचनाच नव्या पायावर करावयाचें होतें. राष्ट्रीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक–समाजाचे सर्व पैलू नव्यानें पाडायचें काम त्या क्रांतीनें हातीं घेतलें होतें. तिला मानवी समाजाच्या जीवनाचीच दिशा बदलावयाची होती. ती एक नुसती राज्यक्राति, एक नुसती धर्मक्रांति, एक नुसती अर्थक्रांति किंवा एक नुसती समाजक्रातीच काय ती नव्हती, तर ती रशियन क्राति होती एक जीवनक्रांति !

प्रत्येक क्रांति हा एक प्रयोग असतो. आजवरच्या साऱ्या क्रांत्यांमध्यें अधिक सर्वंकष नि मानवी जीवनाचें जीवनच बदलूं पहाणारी रशियन क्रांति ही त्याच कारणासाठीं एक अत्यंत अपूर्व, सर्वंकष, जितक्या धाडसाचा तितक्याच धोक्याचा असा मनुष्य समाजानें केलेला एक मोठ्यांतील मोठा सांघिक प्रयोग होता.

---

स्त्री मासिक, फेब्रुवारी १९३६

.त्याच्या पंधरावीस वर्षांच्या अनुभवानंतर आता असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, तो कल्पनेबाहेर यशस्वी झाला आणि अपेक्षेबाहेर फसला. दोन्हीपक्षीं मनुष्याच्या ज्ञानात नी अनुभवांत त्या प्रचंड प्रयोगानें अपूर्व नी अमूल्य भर टाकली.

मानवी जीवनांतील इतर संबंधाप्रमाणेंच त्याच्या वैवाहिक संबंधांतही आमूलात् क्रांति घडवून विवाहाचें मूल्यमापनच बदलून टाकण्याचा त्या जीवनक्रांतीनें केलेला यत्नही तसाच अपूर्व धोक्याचा नी धाडसाचा होता. त्याचे परिणाम काय होतील याचें त्या प्रयोगकर्त्यांना देखील अचूक निदान करता येण्यासारखें नव्हतें. पण आतां इतक्या वर्षांनंतर ते परिणाम निश्चित रूप कांहीं अंशीं धरूं लागले असल्यामुळें त्याची पाहाणी करण्याचें काम रशियन पुढाऱ्यानीं जें हातीं घेतलें तें योग्यच केलें.

विवाहसंबंधांतील सुधारणांमध्यें सगळ्यांत धाडसाची आणि कोणत्याही राष्ट्रानें आजवर अशा प्रमाणांत प्रयोजून न पाहिलेली सुधारणा म्हणजे 'घटस्फोटस्वातंत्र्य' हीच होती. क्रांतिपूर्वी रशियातील लग्नबंधनें अगदीं करकच्च आणि घटस्फोटाची अनुज्ञा अगदीं अपवादात्मक असे. क्रांति होतांच स्त्रीपुरुषांचीं हीं करकच्च विवाह-बंधनें अकस्मात् गळून पडल्यासारखींच झाली ! पक्का बंधारा घालून अगदीं थेंब-देखील न वाहू देता तुंबवून ठेवलेला तुंबळ प्रवाह, तो बंधारा एकदम फुटतांच त्याच्याच उखळलेल्या भिंती, पायाच्या दगडानासुद्धां लाटांवर भिरकावीत धों, धों करीत अस्ताव्यस्त दाटीनें जसा वाहूं लागतो, तशीच स्थिति रशियामध्यें क्रांति होतांच स्त्रीपुरुषांसंबंधींची झाली. समता दुथडी भरभरून वहात चालली ! नातें-गोतें, जात-पात, वय-वशिला, मुहूर्त-मध्यस्थी, टिपण-टीका-धरबंध तेवढा सुटून वाटेल त्या स्त्रीनें वाटेल त्या पुरुषाशीं वाटेल तेव्हा 'संबंध' ठेवावा; सरकारी नोंद-वहींत तो संबंध नोंदविण्याची लहर जर कोणास आली तर त्याच संबधाला लग्न म्हणावयाचें ! संपलें. हाच विवाह. आणि ज्या वेळीं ज्यास वाटेल त्या स्त्रीनें वा पुरुषाने तो संबंध अथवा विवाह संपला असें सरकारी नोंदवहींत लिहावें कीं झाला घटस्फोट. त्या घटस्फोटास एकच काय तें कारण पुरे ! अिच्छा ! क्रांतीनंतर रशिया-मध्यें विवाहस्वातंत्र्य आणि घटस्फोटस्वातंत्र्य जें प्रत्येक स्त्रीपुरुष नागरिकाला एक जन्मसिद्ध अधिकार म्हणून मिळालें, त्याची या लेखापुरती ही रूपरेखा पुरेशी आहे.

पण ! या स्वातंत्र्याचें सहचारी असें एक बंधन मात्र कोणासही टाळतां येणारें नव्हतें. या संभोगस्वातंत्र्याच्या अधिकाराचें प्रतियोगी असें एक जें अपरिहार्य

कर्तव्यहि प्रत्येक नागरिकास पाळावेंच लागे, तें अपत्यसंगोपन हेंच होय. कोणच्याही राष्ट्रांत नसेल इतक्या कडकपणें रशियन सरकार ह्या अपत्यसंगोपनाच्या कर्तव्याची बजावणी प्रत्येक नागरिकाकडून करून घेत आलें आहे.

विवाहबंधनाच्या पायावर उभारलेली साऱ्या जगांतील मानवसमाजाची रचनाची रचना एखाद्या बौद्ध विहारासारखी जशीची तशी आमूलात् उचलून घटस्फोट-स्वातंत्र्याच्या पायावर नेऊन स्थापण्याचा, बौद्ध विहाराचें बोलपटगृह बनवून सोडण्याचा, अद्‌भुत रशियन क्रांतीचा हा प्रयोग पंधरा वर्षें सतत जो चालला त्याचे परिणाम तरी काय झाले ? आज रशियांत माणसाचा अतिमानुष झाला कीं, अमानुष ? का माणसाचा माणूसचा माणूसच राहिला ?

प्रत्येक चिंतनशील व्यक्तीला हा प्रश्न अभ्यसनीयच वाटणार; अगदीं साध्या संसारी स्त्रीपुरुषांना आणि अल्लड कुमारीकुमारांनाहि त्याची माहिती हवीशीच वाटणार; यामुळेंच जगांतील यच्चयावत् वृत्तपत्रांतून रशियांतील या स्त्रीपुरुषसंबंधांतील अपूर्व क्रांतीच्या वर्णनाविषयीं नी परिणामाविषयीं उलटसुलट लिखाण सारखें येत असतें. पण स्वतः रशियन लोकांचा प्रत्यक्ष अनुभव काय आहे, त्या प्रयोगाची शास्त्रोक्त छाननी होऊन त्याच्या परिणामाच्या पद्धतशीर नी अधिकृत चौकशीमध्यें त्या घटस्फोटस्वातंत्र्याचा दुरुपयोग होत चालला आहे कीं सदुपयोग, समाजाच्या हितास अेकंदरींत तो प्रयोग अनुकूल ठरत आहे कीं प्रतिकूल, मनुष्य-समाज त्या पायावरही सुस्थिर राहूं शकतो कीं कोलमडून पडतो, याची त्या वृत्त-पत्रांतील खऱ्याखोट्या भरमसाट लेखांतील अुलटसुलट चर्चेमुळें, सामान्य वाच-कांना कांहींच नक्की कल्पना येत नाहीं. यास्तव रशियन सरकारचें सरकारी वृत्तपत्र जें 'इज्व्हेस्टिआ' त्यांत अधिकृत रीत्या प्रसिद्ध झालेल्या अलीकडच्या लेखांत अेका तज्ज्ञ रशियन महिलेनें चौकशीमंडळाचें घटस्फोटस्वातंत्र्यावरील प्रतिवृत्त प्रकाशिलें आहे. त्यांतील मुख्य भावार्थ आम्ही या लेखांत अनुवादीत आहों. त्यावरून ज्याचें त्यास काय अनुमान बांधावयाचें तें बांधतां येणें पुष्कळ सोपें जाअील. स्वतः रशियनांनींच चौकशी करून छापलेलें हें प्रतिवृत्त असल्यामुळें त्यांना स्वतःला आज तो कितपत मानवलासें वाटतें, तें तरी त्यांच्याच अधिकृत शब्दांमध्यें आपणांस ह्या प्रतिवृत्तांत अैकावयास मिळतें, हें या लेखाचें अेक वैशिष्ट्य-देखील अभ्यासूंना केव्हांहि अुपेक्षणीय वाटणारें नाहीं; सर्वसाधारण वाचकांनाहि आकर्षक वाटल्यावांचून रहाणार नाहीं. महिला वर्गाला तर हा घटस्फोटस्वातंत्र्याचा

प्रश्न अगदींच जिव्हाळ्याचा; कारण घटस्फोटाच्या खिंडींत जर कोणाच्या जीवास अधिक धोका असेल तर तो आसन्नप्रसव महिलाच्याच होय. सृष्टीनेंच ती विषम वांटणी केलेली आहे. स्त्रीपुरुषांमध्यें ह्या प्रसवविषमतेचीही समसमान वांटणी करणें आज तरी मनुष्याच्या शक्तीच्या बाहेरची गोष्ट आहे; तिथें आजचा बोल्शेव्हिक झाला तरी करणार काय? दहा शतकांनंतरचें प्रगत विज्ञान तशी अेखादी युक्ति काढते कीं काय तें कोणीं सांगावें? वरील चौकशीमंडळाच्या प्रतिवृत्तांतील महत्त्वाचा भाग असा :

"अेके दिवशीं सकाळीं अेव्हान अलेक्झेव्हिच नांवाच्या रशियन नागरिकास मोठा आचंबा वाटला कीं, त्याला आपल्या बायकोपोरांच्या पोषणार्थ काय व्यवस्था करतोस तें विचारणासाठीं 'जनिक न्यायालया'चें बोलावणें आत्ताच्या आत्तां हें असें काय म्हणून यावें? गोष्ट खरी कीं त्यानें अलीकडेच आपल्या पत्नीशीं घटस्फोट करण्याची अनुज्ञा घटस्फोट-अधिकाऱ्यांकडून मिळविली होती. आपण तुझ्याशीं घटस्फोट केला आहे ही बातमीसुद्धां त्यानें तिला अजून कळविली नव्हती. कारण रशियांतील नव्या निर्बंधाप्रमाणें (कायद्याप्रमाणें) पतिपत्नींपैकीं कोणीही एकस्यानें जरी घटस्फोट कार्यालयात जाअून घटस्फोट मागितला, तरी तो कां हें काहीं एक कारण न विचारतां आणि दुसऱ्या पक्षाची त्यास संमति आहे कीं नाहीं, दुसऱ्या पक्षाला ती गोष्ट कळली आहे आहे कीं नाहीं, हें देखील न पुसतां त्याला घटस्फोटाची अनुज्ञा द्यावी लागते. बायकोलाही इच्छा होतांच, नवऱ्यास न विचारतां, कांहीं कारण न सांगतां, वाटेल तेव्हां सरकारी कार्यालयांत जाअून, आपण घटस्फोट करणार असें सांगण्यासरशीं काडीमोड करतां येते. अलेक्झेव्हिच त्याच्या बायकोला आपण काडीमोड करण्याची बातमी हळुहळू कळविणार होता. लग्नांतील त्याच्या मुलाच्या पोषणाचा भारही तो तिच्या विचारें विभागून घेणार होता. पण तें कांहीं असलें तरी त्याला विचारणारे हे 'जनिक' ( Public ) अधिकारी कोण? याचा त्याला राग आला! मी रशियन नागरिक, घटस्फोट हा प्रत्येक रशियन स्त्रीपुरुषाचें एक जन्मसिद्ध स्वातंत्र्य! जसें मतस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, विवाहस्वातंत्र्य, संभोगस्वातंत्र्य, तसेंच प्रत्येक नागरिक स्त्रीपुरुषास घटस्फोटस्वातंत्र्य हेंही एक जन्मसिद्ध स्वातंत्र्य आहे! मग हें न्यायालयाचें बोलावणें काय, उत्तर विचारण्याची ऐट काय!—असें रागानें पुटपुटत तो अलेक्झेव्हिच त्या सरकारी कार्यालयात काय गैरसमज झाला तें बघण्यास तावातावानें गेला.

पण वास्तविक गैरसमज असा अधिकाऱ्यांचा झालेलाच नव्हता ! रशियन निर्बंधाप्रमाणें प्रत्येक नागरिकाला घटस्फोटाचें स्वातंत्र्य जसें होतें, तसेंच त्या स्वातंत्र्याचें प्रतियोगी असें अपत्यसंगोपनाचें एक बंधनही घातलेलें होतें. अलेक्झेव्हिच यानें काडीमोड केली ती एकपक्षी होती, त्याची पत्नी त्यावेळीं अधिकाऱ्यासमोर उपस्थित नव्हती, मुलें आहेत हें मानलें असतांही त्याची जोपासना कोण करणार, त्याची हमी कोण देणार, पण पतिपत्नींत त्या बोजाची वांटणी तें दोघें कशी करणार, हें कांहींच अलेक्झेव्हिचनें घटस्फोटाधिकाऱ्यांना सांगितलेलें नव्हतें. अशा प्रकरणीं घटस्फोट जरी देण्यांत आला तरी रशियन निर्बंधाप्रमाणें तें प्रकरण त्या अपत्यसंगोपनाच्या चौकशीसाठीं 'जनिक न्यायालय' नावाच्या विशिष्ट संस्थेकडे धाडावें लागे, आणि त्या अधिकाऱ्यांकडून त्या घटस्फोटी व्यक्तीला बोलावून वरील व्यवस्था करण्यांत येत असे. पण घटस्फोटस्वातंत्र्याची तेवढी सोयीची नैर्बंधिक माहिती खडान् खडा असणाऱ्या त्या अलेक्झेव्हिचला ह्या अपत्यसंगोपनविषयक कर्तव्यासंबंधीं रशियाचा सरकारी निर्बंध आहे ती गैरसोयीची नैर्बंधिक माहिती तेवढी नव्हती ! 'घटस्फोट' किंवा 'विवाह' किंवा नुसता 'संबंध' हे जरी सर्वस्वीं व्यक्तींच्या आवडीनिवडीचे प्रश्न म्हणून रशियन निर्बंधानें व्यक्तीच्या अिच्छेवर सोंपविले असले, तरी रशियन निर्बंध, सोव्हियट सरकार, अपत्यसंगोपन हा विषय कांहीं व्यक्तीच्या अिच्छेवर सोडीत नाहीं. तो व्यक्तिस्वातंत्र्याच्या कक्षेबाहेरील राष्ट्राच्या अधिकारांतला विषय. रशियनाचीं अपत्यें ही रशियन राष्ट्राची संतति. तें जें राष्ट्रीय सोव्हियट सरकार 'स पिता पितरस्तेषाम् केवलं जन्महेतवः।' ही जाणीव अलेक्झेव्हिचला नव्हती म्हणून त्याला अधिकाऱ्यांचाच गैरसमज झालासें वाटलें. वास्तविक पाहातां गैरसमज असा त्याचाच झालेला होता.

रशियन नागरिकांमध्यें घटस्फोटविषयक निर्बंधाची ज्याला यथास्थित जाणीव नाहीं आणि त्यामुळें ज्याला अपत्यसंगोपनाचें आपलें दायित्व (जबाबदारी) काय याची बिनचूक माहिती नाहीं असा वरील अलेक्झेव्हिच हा अेकच गृहस्थ होता काय ? जर तो तसा अेक अपवाद नसेल तर वैवाहिक कर्तव्यांविषयीं जाणीव नसलेले असे किती नागरिक रशियामध्यें आहेत ? किती लोक अगदीं अज्ञाच निष्काळजी बेछूटपणें लग्नाच्या पाशांत शिरतात ? रशियानें चालविलेल्या या स्त्री-पुरुषसंबंधविषयक क्रांतिकारक प्रयोगाचे काय परिणाम झाले आहेत ? लग्न, संभोग, संबंध, घटस्फोट, अपत्य नी कुटुंब या अत्यंत गंभीर विषयांसंबंधींच्या आपल्या

राष्ट्रीय कर्तव्यांची हेळसांड अितक्या मोठ्या जनसंख्येकडून होत आहे की काय, कीं तें रशियन समाजाचेंच एक सांघिक व्यंग समजणें भाग पडावें ?

या प्रश्नाची योग्य नी सशास्त्र चौकशी करण्यासाठीं रशियांतील मातृपद नी बाल्यावस्था यांच्या संरक्षणार्थ स्थापलेल्या संस्थेनें अेकट्या मॉस्को नगरातील दोन हजार कामकरी कुटुंबाची म्हणजे जवळ जवळ सात हजार लोकांची पहाणी नी छाननी केली. आमच्यापुढें मुख्य प्रश्न होते ते हे : लग्नें किती अवधीपर्यंत टिकतात ? जे घटस्फोट होतात त्याची मुख्य मुख्य निमित्तें काय असतात ? काय काय उद्देशानें लोक लग्नें करतात ? लग्न लावण्यापूर्वी त्या स्त्रीपुरुषांचे पूर्वीचे दाट परिचय असतात काय ? त्या परिचयांत अेकमेकांचे स्वभाव अेकमेकांच्या कसोटीस किती प्रमाणांत उतरलेले असतात ? साधारणतः विवाहितांचीं वयें लग्न होतांना किती असतात ?

या चौकशींत प्रत्यक्ष वस्तुस्थितीची नी गणिताची रुक्ष भाषासुद्धां आम्हांस हेंच स्पष्टपणें सांगती झाली कीं, कामकरी वर्गातील बहुसंख्य लोक विवाह नी घटस्फोट याच्या प्रकरणीं गंभीरपणें नी विचारपूर्वकच वागतात.

तरी देखील अद्याप कांहीं अुदाहरणांतून हलकट ढोंगधत्तुरा, स्त्रियांची पूर्वी-प्रमाणेंच हेळसांड आणि आमच्या विवाहस्वातंत्र्याच्या निर्बंधाचा घेतलेला अन्याय्य लाभ, हीं व्यंगेंहि आढळून येतात.

## साधारणतः रशियन स्त्रिया सध्यां कोणत्या वयांत विवाह करतात ?

आमच्या पहाणी मंडळानें निरीक्षिलेल्या प्रत्यक्ष अुदाहरणावरून नी संख्येवरून हें सिद्ध होतें कीं, क्रांतीपूर्वी शेंकडा ३० मुली सतराव्या वर्षाच्या आंतच लग्न करीत. शेंकडा ७० सरासरीनें विसाच्या आंतबाहेर. चोवीस वर्षांनंतर लग्न केलेली मुलगी आढळणें दुर्मिळच असे. अेकंदरींत असें नक्की विधान करता येतें कीं, क्रांतीपूर्वी मुलींच्या लग्नाचें वय सतरा हें असे. चोवीसाव्या वर्षानंतर मुलींना लग्नाचें ठिकाण मिळणेंच दुर्घट होअी. लग्नें इतक्या लवकर म्हणजे सतराव्या वर्षीच होण्याचें मुख्य कारण म्हणजे बहुतेक मुलींचीं लग्नें पूर्वी आअीबापच आपल्या सोयीप्रमाणें नी आपल्या अिच्छेप्रमाणें, आपल्यास आवडेल त्या स्थळीं लावून देत. अुशीरां स्वतः लग्न करणाऱ्या मुली दुर्मिळ असत; याचें मुख्य कारण हेंच कीं, मुलींना लग्नावांचून स्वतःचा मोक्ष चालविण्याचा दुसरा मार्गच मोकळा नसे. यासाठीं शक्य तितक्या

लवकर त्यांची सोय आओीबाप कुठेंतरी लावून देण्याच्या, लग्न करून टाकण्याच्या घाओींत असत.

पण क्रांतीनंतरच्या विवाहाच्या चौकशींत ही स्थिति पालटलेली आढळली. आज सरासरी शेंकडा ४८ मुली विशीच्या नंतर लग्नें करतात, शेंकडा ३६ चोविसाच्या आंत. वयाच्या अठ्ठावीस-अेकुणतिशीपर्यंत लग्नाची अधिकात अधिक वयोमर्यादा पडलेली आढळते. आओीबापाच्या लाभालाभाच्या अनुषंगानें बळेंबळें लावलेल्या मुलींच्या लग्नांचीं अुदाहरणें आढळत नाहींशीं झाली आहेत. सोव्हिएट रशियांतील मुलगी आतां तिच्या अिच्छेविरुद्ध अल्प वयांत कुठेंतरी ढकलणें बंद पडलेलें असून ती स्वतःचें लग्न स्वतःच्या विवेकानें ठरविण्याअितकी अुपवर असते, हें तिच्या वाढलेल्या वयोमानावरूनहि स्पष्ट होतें. विवाहसंस्थेची महति महिलावर्गास पटत चालली असून त्या प्रश्नाचा स्वतः गंभीरपणें नीट विचार केल्यावांचून लहरीसरशीं कांहींतरी करून टाकण्याची ती गोष्ट नव्हे, हें सोव्हिएट मुलींना चांगलें कळूं लागलें असल्याचाच तो स्पष्ट पुरावा आहे.

**विवाहपूर्व परिचय :** विवाह ही विचारपूर्वक करण्याची अेक महत्त्वाची गोष्ट आहे, ही जाणीव सोव्हिएट महिलांमध्यें दिवसेंदिवस वाढत चालली आहे, याचाच दुसरा पुरावा म्हणजे, विवाहपूर्व परिचयांची वाढ. क्रांतीपूर्वी शेंकडा ५३ लग्नें वधूवरांचीं ओळख अेक महिनादेखील झाली नाहीं तोच घडत, असें आढळून आलें. ज्या वधूवराचा परिचय लग्नापूर्वी निदान अेक वर्षभर तरी होता अशीं लग्नें शेंकडा २२ देखील आढळून आलीं नाहींत. ज्या कारणांसाठीं क्रांतीपूर्वी मुलींचीं लग्नें लाविलीं जात, त्या कारणांची शेंकडेवारीसुद्धां वरील प्रकारचीं पूर्व-परिचयावांचून लागलेलीं लग्नें अितकीं पुष्कळ कां असत ते अुलगडून दाखविते. आओीबापाच्या संतोषासाठीं, किंवा श्रीमंतीच्या हैसेनें निव्वळ व्यापारी सौदा म्हणूनच लागलेलीं लग्नें क्रांतीपूर्वी शेंकडा ५३ याच प्रमाणात आढळत. अर्थातच क्रांतीपूर्वी अशा लग्नांमध्यें पूर्वपरिचयाची आवश्यकताच अशा अल्पवयी वा अल्पबुद्ध वधूवरांना वाटत नव्हती, ही अगदीं क्रमप्राप्तच गोष्ट होती.

पण क्रांतीनंतर पूर्वपरिचयाची आवश्यकता अेकसारखी वाढत चालली. सध्यांचे आंकडे पाहिले तर वधूवरांचा दाट पूर्वपरिचय निदान सहा महिन्यांहून अधिक काळ झाल्यानंतर जीं लग्नें झालीं त्यांची संख्या शेंकडा ५३ पडते, आणि अेक महिन्या-

ऱ्याच पूर्वपरिचयाची संख्या शेंकडा २१. यद्यपि जास्त दिवस पूर्वपरिचय झाल्यानतर लग्नें जीं होऊं लागलीं त्याचें कारण पूर्वपरिचयाची आवश्यकता लग्न सुखावह होण्यास अवश्य आहे याची मुलींना जाणीव झाली, हेंच काय तें नाहीं हें खरें; तथापि बहुसंख्य अुदाहरणामध्यें लग्नापूर्वी पूर्वपरिचय जितका दाट होईल तितके परस्परांचे स्वभाव, व्यंगे, आकांक्षा नी ध्येयें हीं अन्योन्यांना कळून आल्यामुळें मग स्वेच्छेनें झालेल्या त्यांच्या विवाहात फसगत होण्याचा संभव कमी कमी होत जातो हें पटल्यामुळेंच, पूर्वपरिचय पुष्कळ दिवस चालविला नी मग विचारपूर्वक पटलें म्हणूनच लग्न केलें असें आढळून आलें. तरी देखील अद्याप अेकपंचमांश लग्नें अेका महिन्याच्या घाअीघाअीच्या परिचयानंतर लगोलग घडत आहेत ही गोष्ट चिंताजनक आहे. अशामुळेंच लग्नानंतर लवकरच वधूवरात असंतोष माजून काडीमोड करण्याचे प्रसंग येतात.

**आतां घटस्फोटाकडे वळूं :** बहुतेक सोव्हिएट दांपत्यांचे संसार टिकून रहातात, घटस्फोट होत नाहींत. ज्यांचे घटस्फोट होतात त्यांचीं कारणें बहुधा अशीं असतात : स्वभावविरोध हें घटस्फोटाचें मुख्य कारण दिसतें. जास्त संख्या याच कारणाची. शारीरिक कारणेंही घटस्फोट घडवून आणतात. मनुष्याच्या स्वभावाची कितीही परीक्षा केली तरी कांहीं कालानें अपूर्व सकटांत, परिस्थितिभेदात, मनस्तापात किंवा अपूर्व आमिषानें पूर्व स्वभावांत अचानक नी अनपेक्षित पालट होतो हें मानवी मनाच्या रचनेचें मोठें व्यंग आहे. ह्या नैसर्गिक परिवर्तनशीलतेला अुपाय नाहीं. अगदीं लहानपणापासून ज्याचा पूर्वपरिचय, ज्यांची परस्पर अखंड प्रीति, अनेक वर्षांच्या सहवासानंतर ज्यांनीं विवाह विचारपूर्वक केला, त्यांच्याही स्वभावांत परिस्थिति बदलतांच काहीं शारीरिक वा मानसिक व्यंगें अकस्मात् प्रादुर्भवून अितका तीव्र विरोध येतो कीं, त्याचें अेकत्र रहाणें म्हणजे दोघांचेंही जीवन मातीस मिळविणें होतें. अशीं उदाहरणेंही आमच्या चौकशींत आढळली. अशा प्रकरणींच घटस्फोटस्वातंत्र्य जे सोव्हिएट क्रांतीनें स्त्रीपुरुषांना पूर्णपणें दिलेलें आहे त्याविषयींचे आमचे सोव्हिएट निर्बंध (कायदे) किती अुपयुक्त नी न्याय्य आहेत तें पडताळून पाहता येतें. अशा अपरिहार्य स्वभावचंचलतेमुळें वा कोणाच्याही चुकीमुळें जे विवाह अत्यंत दुःखदायक, द्वेषपूर्ण नी राष्ट्रीय अहिताचे ठरतील त्यांना दिखाअू अेकींत डांबून ठेवून त्या दोन्ही जीवांना बळेंबळें दुःखांत पिचत ठेवणें, गुप्तरूपानें विवाहबंधन हवें तितके वेळां अन्योन्यांचा विश्वासघात

करून अन्योन्य तोडीत असताही त्या दांपत्यास तसें तें विवाहबंधन प्रामाणिकपणें आणि प्रकट रीतीनें मात्र तोडूं न देणें, घटस्फोट करूं न देणें, कपटालाच अुत्तेजन दिल्यासारखें होतें. ह्यालाच लेनिन 'हलकट' ढोंग म्हणे! प्रत्येक मनुष्यास प्रामाणिकपणें आपलें जीवन सुधारण्याची संधि दिली पाहिजे. कौटुंबिक आततायीपणा, कलह, हत्या, नी असह्य दुःख टाळणारा सोव्हिएट्चा घटस्फोटस्वातंत्र्याचा निर्बंध हा अशाच प्रसंगीं मनुष्यास अेखाद्या वरदानासारखा अुपयोगीं पडतो, जीवनाचा पुनरुद्धार करतो.

घटस्फोटांच्या कारणांत आणखी अेक कारण विशेषतः अुल्लेखनीय आहे. तो 'जुन्या' नीतिकल्पनांचा अेक दुष्ट अवशेष अद्याप टिकून राहिलेला आहे. तें कारण म्हणजे, पुरुषवर्गांतील कांहीं कांहीं माणसांनीं केलेला पत्नीवरील ठराविक आक्षेप: 'मला वाटलें, लग्नाच्या वेळीं तिचें कौमार्य अखंडित होतें; पण लग्नानंतर मला समजून आलें कीं, माझी ही वधू अखंडकौमार्य नव्हती! म्हणून मी घटस्फोट करणार!' हें पुरुषी गाऱ्हाण्याचें अुदाहरण झालें. स्त्रीनें तेवढें लग्न होअीतों अखंडितकौमार्य असलें पाहिजे, पुरुषानें कसेंही असलें तरी हरकत नाहीं, ही जुनाट नीतिमत्ता पक्षपाती नी टाकाअू आहे. घटस्फोटाचें दुसरें ठराविक कारण म्हणजे मद्यपान. स्त्रिया नी पुरुष दोघेंही केव्हां केव्हां या व्यसनापायीं संसार चालविण्यास सर्वथैव अयोग्य होतात. स्त्रियांना मारहाण करण्याची पाशवी प्रवृत्तीही पुरुषांतून अजून थोड्याफार प्रमाणात सापडते. अशा अुदाहरणांत स्त्री जेव्हां जेव्हां घटस्फोट मागावयास येते, तेव्हां तेव्हां घटस्फोटस्वातंत्र्यामुळें सोव्हिएटमधल्या स्त्रिया दिवसेंदिवस धीट, स्वावलंबी, आणि प्रेमादरावाचून धंदेवाअिकपणें कोणाही पुरुषाशीं संबंध न ठेवणाऱ्या होत चाललेल्या आहेत, ही समाधानकारक गोष्टच प्रत्ययास येते.

तो थोर लेनिन म्हणाला होता कीं, 'स्त्रीपुरुषांच्या वैवाहिक जीवनात जी क्रांति आम्हीं घडवून आणली आहे ती आम्हांस अत्यंत अभिमानास्पद आहेच आहे!' घटस्फोटस्वातंत्र्याचा, संभोगस्वातंत्र्याचा, स्त्रीपुरुषसमतेचा नी अपत्यसंगोपनबंधनाचा, असे या प्रकरणीं जे जे निर्बंध सोव्हिएटनें केले ते असामान्य नी अद्भुत होते यांत शंका नाहीं. पण अशा असामान्य नी अलौकिक निर्बंधांची बजावणीही तशीच असामान्य सक्तीनें नी दक्षतेनें झाली पाहिजे तर खरें! घटस्फोटस्वातंत्र्यानें विवाहसंस्था अुच्छेदिली गेली नाहीं, तर ती पूर्वीच्या अनुमानधपक्याच्या पायापेक्षाही बळकट अशा सुबुद्ध, सुसंस्कृत नी सुस्थिर पायावर पुनरुद्धारिली गेली

आहे ! हेंच आमच्या चौकशींत अुघड झालें. तरी देखील अजूनही खालील प्रकरणीं आमच्या वैवाहिक निर्बंधाची बजावणी अधिक कसोशीनें करणें अवश्य आहे.

पहिली गोष्ट अशी कीं, अेकच जण जेव्हां घटस्फोट मागावयास येतो, त्यास घटस्फोटाची अनुज्ञा मिळण्याच्या आधींच दुसऱ्या पक्षास समक्ष बोलावून घटस्फोटाचीं कारणें सागणें अधिक युक्त होईल. आजच्यासारखी घटस्फोट झाल्याची सरकारी सूचना नुसती धाडणें पुरेसें नाहीं. विशेषतः पुरुष अेकपक्षीं घटस्फोट मागण्यास आला तर स्त्रीला समक्ष बोलावून ती गर्भार आहे कीं काय, असल्यास तिच्या जोपासनेचा नी अपत्यसंगोपनाचा बोजा दोन्ही पक्षावर समतेनें टाकण्याची कडक व्यवस्था आधीं ठरवून मगच घटस्फोट करूं देणें बरें. दुसरी अगदीं निकडीची गोष्ट म्हणजे प्रचार ! अद्याप पुष्कळ तरुणतरुणींना आमच्या वैवाहिक निर्बंधांचें ज्ञान मुळींच नसतें. ते अजाणपणानें लग्ने लावतात आणि त्यामुळें या लेखात प्रथमारंभीं दिलेल्या अलेक्झेव्हिचच्या अुदाहरणाप्रमाणें अपत्यसंगोपनाचा बोजा त्यांच्यावर कसा पडणारा असतो याविषयीं त्याना असावी तशी सुस्पष्ट जाणीव नसते; यास्तव लग्न नोंदतांनाच वधूवरांनीं आपली पूर्वी नोंदविलेलीं वा बिननोंदीचीं किती लग्नें झालीं होतीं नी अपत्यें किती यांची बिनचूक माहिती सरकारास दिली पाहिजे आणि ती नी अितर माहिती देण्यात जर कोण्या स्त्री-पुरुषानें कपटी लपवालपवी केल्याचें अुघडकीस आलें, तर त्यांना कडक शिक्षा झाली पाहिजे. सोव्हिएटसारख्या समाजसत्तावादी राज्यात प्रत्येक स्त्री-पुरुषाला विवाहनिर्बंधाची नी अपत्यसगोपनाच्या दायित्वाचीं (जबाबदारीची) पूर्ण माहिती असणें आणि स्त्रियाना नी मुलांना कोणत्याही प्रकारें वाअीट रीतीनें वागविण्याची सक्त बंदी असणें हें अगदीं अवश्य आहे. अपत्यसंगोपनाच्या कर्तव्यांत यत्किंचित् ढिलाअीसुद्धां अक्षम्य आहे."

विवाहविषयक निरीक्षण-मंडळाच्या ह्या चौकशीवरील प्रतिवृत्तामध्यें प्रतिपादिलेलीं मतें चर्चिण्याचा या लेखाचा अुद्देश नसल्यामुळें रशियन लोकाच्या स्वतःच्याच आत्मनिरीक्षणात त्यांच्या क्रांतिकारक वैवाहिक स्थित्यंतराविषयीं त्यांना काय वाटतें, त्या अर्थी प्रयोगाचे परिणाम त्यांना किती परवडतात, त्याची ताजी नी अधिकृत माहिती अिकडील वाचकाना कळावी, अेवढ्याचसाठीं तें प्रतिवृत्त संक्षेपतः वर अनुवादिलेलें आहे. त्यांत दिलेल्या घटना नी गणना ( facts & figures ) आपला जो काय मथितार्थ व्यक्तवावयाचा तो स्वयमेव व्यक्तवीत आहेतच.

# आठवा किरण

## उच्चांकांची सांथ

•

आमचे मित्र बॅ. खाजगीवाले यांनीं लंडनपर्यंतच्या मोटारप्रवासाच्या त्वरेंत जागतिक अुच्चांग पटकावला, रेकॉर्ड केलें. त्या वेळेपासून कित्येक प्रकरणीं जो तो हिंदी स्पर्धाळु जगाचे जुने अुच्चाक मोडून नवे अुच्चाक प्रस्थापीत आहे, जगावर ताण करीत आहे !

त्यांतही अेक विशेष गोष्ट ही कीं, धावणें, लढणें, जिंकणें, शोधणें, (discover) ! कल्पिणें (invent) प्रभृति ज्या ज्या विषयांना अुच्चांक पटकाविण्यासाठीं जग निवडतें त्या त्याच जुन्यापुराण्या विषयांत आमचे स्पर्धाळु चढाओढ करण्याची गतानुगतिकता दाखवीत नाहींत; तर आमच्या विशिष्ट आर्यसंस्कृतीस शोभतील अशीं पराक्रमाचीं क्षेत्रें देखील नवींनवींच निवडीत आहेत ! जगावर ताण करण्याचे विषय निवडण्यांत देखील अुच्चांक पटकावीत आहेत ! आमच्या या गर्वोक्तीला कुणीं युरोपियनानें स्वराष्ट्राभिमानाची पोकळ वल्गना म्हणूं नये, यासाठीं आम्ही वरील विधानांना समर्थिणारीं कांहीं अुदाहरणेंच खालीं देतों. यूरोपचे एकमेकांवर ताण करण्याचे नेहमींचे टाकाअू विषय म्हणजे विमानोड्डाणें, ध्रुवसमुद्रोल्लंघनें, दिग्विजय, विषारी वायु शोधणें, दूरध्वनि, दूरदर्श, (टेलेफोन, टेलेव्हिजन) बिनतारी

प्रभृति यंत्रे अुद्भाविणें अशा ठराविक पद्धतीचे असतात. पण आमच्या स्पर्धालूंनीं अुच्चांक पटकावण्याच्या विषयाच्या निवडणुकीतच कसा अुच्चांक पटकावण्याचा धडाका अुडविला आहे पाहा. युरोप निवडते त्या सोप्या विषयाना तुच्छवून किति दुर्घट क्षेत्रे स्पर्धेसाठी आमच्या वीरांनीं निवडलीं आहेत बघा!

अेका वीरानें गोस्तुति हाच अतिदुर्घट विषय स्पर्धेसाठी निवडला. गो र क्ष ण पत्राच्या मुखपृष्ठावरच धेनूचें, तेहतीस कोटी देवाच्या रेटारेटीनें पंढरीच्या यात्रेस निघालेल्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यास लाजविणारें, अेक सुशोभित चित्र छापून त्यावर मोठमोठे मथळे दिले आहेत. "विश्वाची अनभिषिक्त राज्ञी! जगज्जननी! आदिदेवता! श्रीमती गोमाता! विश्वाचें कल्याण करो!!"

कोणास वाटेल, आम्ही गोस्तुतीचें हें काल्पनिक विडंबन करीत आहो! तो आक्षेप येअू नये म्हणून त्या गोमातेच्या नी रोमहर्षक गोरूपधारी मुखपृष्ठाच्या तिथितारखेसुद्धा पत्ता देतो. नाहींतर रा मा य ण ही अिजिप्तमधली कथा आहे असे शोध लावणारा कोणी भावी जाडा अैतिहासिक ही गोगीता नी गोचित्र लोहयुगीन अमेरिकेच्या जंगलातील कोण्या रेडअिंडियनाच्या अर्थशून्य छाछूंतलें वाङ्मयचौर्य होय, असा तर्क लढवूं लागायचा! यास्तव स्पष्ट सांगून ठेवतों कीं, गो र क्ष ण मासिकाच्या शके १८५७ व्या वर्षाच्या आषाढ वद्य १ बुधवार ह्या शुभमुहूर्ती, ता. १७ जुलै १९३५ ला, निघालेल्या अंकात हें गोचित्र नी ही गोगीता प्रकटली आहे. अगदीं या विसाव्या शतकातला तो एक अपूर्व शोध आहे—छाछू नव्हे!

पवित्र गाय ही बैलाची काय ती जननी मानली जाअी. पुढे असा शोध लागला कीं, ती हिंदूंचीही जननी आहे. आता त्याही शोधास मागे टाकणारा हा शोध लागला आहे कीं, ती अवघ्या 'जगाची जननी' आहे! 'जगज्जननी' आहे!!

प्रथम गाय ही बैलाचीच राज्ञी होती. पुढें काहीं गोशाळांतील गोठ्यांची राज्ञी झाली. आता तिचें हे साम्राज्य वाढता वाढता ती 'श्रीमती गोमाता' 'विश्वाची अनभिषिक्त राज्ञी' झाल्याची ही ताजी तार आली आहे! ती गोमाता अजून अनभिषिक्तच का राहिली आहे, अेवढें काय ते कळलें नाहीं. क्वचित् गायीला वेदोक्ताचा अधिकार आहे किंवा नाहीं याचा वाद शिवछत्रपतींच्या राज्याभिषेकाच्या वेळीं खो घालणाऱ्या कोणा पैठणच्या पंडितांनीं काढला असल्यास तो ठिकच्या ठिकाणीं जिरवून त्या गोमातेचा वेदोक्त राज्याभिषेक पार पाडणारा गागाभट्ट गो र-

क्षण वृत्तपत्राच्या कार्यालयात अजून सापडला नसेल. तसा कोणीतरी लवकरच सापडो आणि अजून अनभिषिक्तच राहिलेली ती 'श्रीमती गोमाता' 'विश्वाची अभिषिक्त सम्राज्ञी'ही अेक दोन अंकातच होवो, हीच 'विश्वा'ची अुत्कट अिच्छा केव्हाही असणारच!

ह्या गोपुराणांत वर्णिल्याप्रमाणें श्रीमती गोमाता ही सूर्य, चंद्र, तारे, पृथ्वी, वायु, विष्णु, प्रभृति यच्चयावत् जगाची 'जगज्जननी' नी यच्चयावत् देवाची 'आदिदेवता' आहे असें आम्ही सनातनी लोकच काय तें म्हणत नसून, ह्या गोगीतेला केवळ 'वेदोक्त'चाच आधार आहे असें नसून, 'साहेबोक्त'ही तेंच म्हणत आहे, हें सिद्ध करण्यासाठीं अमेरिकेतील कोणातरी फाटक्यातुटक्या साहेबाचा कुठलातरी पण अिंग्लिश भाषेंतला अुतारा मात्र आता गोरक्षण मासिकाच्या येत्याच अंकात प्रसिद्ध होणें अवश्य आहे! पण तें अवघड कृत्य करूं धजल्यास जो एकच पंडितप्रवर काय तो करूं धजेल तो पंडितप्रवर म्हणजे आपले समाजशास्त्रज्ञ, श्रीयुत गो. म. जोशी, बी. अे. (ऑनर्स)!! गोठ्यांत बाधलेल्या गायीला 'हे जगज्जननी! आदिदेवते! हे विश्वाचे अनभिषिक्त राज्ञी! श्रीमती गोमाते!' असें संबोधिणारा कोणीतरी साहेब त्या अफाट अमेरिकेंत श्री. गो. म. जोश्यासारख्या समाजशास्त्रज्ञास सापडलाच पाहिजे. सारी अमेरिका धुंडाळण्यास वेळ नसलाच तर श्री. जोशीमहाशयानीं अमेरिकेंतील दोनचार प्रतिष्ठित भ्रमिष्टालयें (lunatic asylums) तेवढीं जरी धुंडाळलीं तरी काम भागेल!

गाय ही 'जगज्जननी' आहे हा शोध असा लागल्यामुळें अनेक अद्याप अज्ञात गूढें अुकलणें आता अगदीं सोपे झालें. सूर्य, चंद्र, पृथ्वी ह्याचा पिता 'कावळा' होय असें उत्तर ध्रुवाकडील काहीं आदिमानव जाती (ज्यांना उर्मट लोक रानटी किंवा अडाणी जाती म्हणतात) त्यांच्या धर्मकथातून सांगितलेलें आहे. अर्थात् जगाचा पिता 'कावळा' हा शोध लागलेला होता. पण सूर्य, चद्र, पृथ्वी याची जननी कोण हें गूढ कांहीं अद्याप सुटलें नव्हतें. तें आता ह्या गोरक्षणाच्या अंकानें निर्विवादपणें सोडविलें आहे. जगत्पिता जसा 'कावळा' तशीच जगज्जननी जगन्माता 'गाय'! सूर्य, चंद्र, पृथ्वी सारीं त्या गायीच्या पोटीं जन्मलेलीं गायीचीं वासरें होत. तिच्या दुधावर तीं वाढलीं. गोदुग्धाचा महिमाच तसा आहे! चंद्र अितका सात्त्विक, थंड, शीतल, शात का, तेंही आता स्पष्ट झालें. तो गायीचें दूध, त्या जननीचें, गोमातेचें धारोष्ण दूध नियमानें पोटभर पीत असला पाहिजे.

हेही गायीचेंच वासरूं; मग तितका सात्त्विक शीतळपणा का नाहीं त्याच्या अंगात, शी कडकी का ? म्हणून जर कोणी पाखंड बाष्कळपणें शकेल, तर त्याचें तोंड णचाही धेनुदास तत्काळ असें बंद करील कीं, 'तो दोष गायीच्या दुधाचा नाहीं! ं, जिच्या पोटीं तो जन्मला, त्या गायीचें दूध पिणें सोडून, हलुहळू चहा पिण्यास कावला आणि त्या दुष्ट चहाच्या व्यसनामुळें सूर्याच्या अंगात अशी कडकी, ळजळ नी हाडींताप मुरला !' राहूनें मधून मधून ग्रासण्याअितका सूर्य दुर्बल जो ला तोही याचमुळें. ज्या दिवशीं त्या अमृताचा अेक बिंदु राहूच्या तोंडात पडला ' तो बळावला त्याच दिवशीं जर सूर्य चहा न पिता गायीचें दूध प्याला असता, ( तो राहूला हार जाता ना, हें उघड आहे. कारण अमृत झालें तरी साऱ्या जगाची जननी' जी 'आदिदेवता' गोमाता तिच्या गोरसापेक्षा अधिक सत्त्वस्थ सणें शक्यच नाही !

गाय ही जगज्जननी आदिदेवता आहे हीं महासत्यें कळण्याअितकी बुद्धि अेकदां त्वशुद्ध झाली कीं, वरील गूढें अुकलण्याअितकी ती कुशाग्रही झालीच पाहिजे !!

आम्हींही, आमच्या धेनुदासवर्गानें जगाशीं स्पर्धा करण्यासाठीं अगदीं अपूर्व आणि ामच्या सनातनपणास साजेल असें हें गयाळपणाचें क्षेत्र निवडून गाय ही जगज-नी नी आदिदेवता आहे, हा अत्युद्‌भुत शोध लावला नी गयाळपणात 'उच्चांक' :कावला, गयाळपणाचें 'रेकॉर्ड' केलें, याविषयीं गोरक्षण वृत्तपत्रास मनःपूर्वक भिनदितों !

आणि आमच्या गोठ्यांत खुंट्याशीं बांधून ठेवलेल्या ह्या गायीस त्या गोरक्षण त्रांतील गोगीतेच्या शेवटच्या मंत्रास अनुसरून प्रार्थितों कीं, 'हे विश्वाचे अन-ाषिक्त राज्ञी ! विश्वाचें कल्याण कर ! एक दोन त्वर्य ( urgent ) गाऱ्हाणीं तर ाजच्या आज दूरवीव. पहिलें गाऱ्हाणें हें कीं, ही बिचारी पृथ्वी सारखी युगोंयुगें ागर फिरत आहे, तिला भोंवळ येईल ! यास्तव तिला, आमच्या मानवांवर ाचा काहींही अनिष्ट परिणाम होऊं न देतां, गिरणीकामगार संघाच्या मागणी-माणें प्रत्यहीं एक तास स्वस्थ बसून विसावा घेण्यासाठीं सुटी द्यावी. आणि दुसरें ाऱ्हाणें हें कीं, ह्या ध्रुवाला, पृथ्वीच्या उलट, जी एकाच जागीं युगोंयुगें डांबून वण्याची आमच्यासारखी स्थलबंदीची शिक्षा झालेली आहे, ती रद्दवून मरणाचे ाधीं एकदां तरी निदान चारी धर्मांची यात्रा करून घेण्याची अनुज्ञा द्यावी ! हे

माझ्या गोठ्यांत बैलासह खुंट्यांशीं बांधून टाकलेले गायी, तूं विश्वाची अनभिषिक्त सम्राज्ञी आहेस ! विश्वाचें कल्याण कर ! तुला ह्या गवताच्या नी कडब्याच्या पेंड्या मी प्रत्यहीं पोटभर खावयास देईन !!'

गाय ही जगज्जननी नी आदिदेवता होय हा शोध लावून गयाळपणांत गोरक्षण पत्रानें जसा जागतिक अुच्चांक पटकावला, तसाच दुसऱ्या अेका तितक्याच अपूर्व क्षेत्रात दुसरा अेक जागतिक अुच्चांक पटकावण्यासाठी नारायणमहाराज केडगावकर यानींही कंबर कसली आहे. जगात आजवर पुष्कळ सत्यनारायण झाले; पण एका बैठकीस चौरगास चौरंग भिडवून दोन हजार सत्यनारायण अेकसमयावच्छेदें साजरे करण्याची धमक कोणाही मायेच्या पूतानें आजवर दाखविली नव्हती ! तो विक्रम नारायणमहाराज हे करून सत्यनारायणीय अुच्चांक पटकावणार आहेत !

ही बातमी अैकतांच सारी अमेरिका नी युरोप गर्भगळित व्हावीं यात काय आश्चर्य ! सत्यनारायणाच्या पोथींत अेकेका सत्यनारायणासरशीं अेकेका राजानें आपलें गेलेलें अेकेक राज्य परत जिंकलें अशा कथा आहेत. सत्यनारायणाचा हा प्रताप माहीत असलेल्या यूरोप–अमेरिकेला अेका सत्यनारायणानें अेक राज्य या दरानें दोन हजार सत्यनारायणानी किती, हेंच त्रैराशिक सहज सुचलें आणि आता आपल्या राष्ट्राचें होणार तरी काय, केडगांवकर किती राज्यें जिंकणार, म्हणून ते थरकांपूं लागले !

वेडे बिचारे युरोपियन! जडवादी राज्याचे भुकेले! त्याना काय माहीत कीं, आम्ही अशा राज्याराष्ट्रासारख्या तुच्छ नी आचरट गोष्टींचे लालसू नाहीं! पूर्व युगातील गोष्टी पोथींत दिल्या आहेत, त्या वेळीं आमच्या लोकाना तसे सकाम सत्यनारायण करण्याची खोड असे. पण त्या सकाम भक्तीचाच विकास नी अुदात्तीकरण ( sublimation ) होअून आमची आजची भक्ति पूर्ण निष्काम, अगदीं निकम्मी झालेली आहे ! काहींतरी लाभ व्हावा अशा तुच्छ सकाम बुद्धीनें आम्ही हे सत्यनारायण मुळातच करीत नाहीं. हे पांचपन्नास हजार रुपये जर कांहीं लाभासाठींच आम्हास खर्चायचे असते तर आम्ही ते त्या डॉ. मुंजाच्या ज्या सैनिक विद्यालयास अिंग्रजाच्या सरसेनापतीनेंसुद्धा 'हूं, करीतच आहांत; करा !' असें सांगितलें, त्याला नसती का अेवढी मोठी रक्कम दिली ? किंवा ज्या आमच्या हिंदु अर्भकाना कोणी पाळीना म्हणूनच परधर्मियांच्या खाअींत ढकलावें लागतें,

त्या अनाथ लेंकराना वाचवून हिंदु धर्माच्या दृष्टीनेंही अेक अत्यंत धार्मिक नि परोपकारी कृत्य करण्यासाठीं त्या रकमेत एक अनाथालय आम्हांस स्थापितां आलें नसते का ? पण त्या प्रकारचें धर्मकृत्य करण्यात मोठें व्यंग हें असतें कीं, तीही जरी अीश्वरभक्तिच असते तरी ती सकाम होते. तशा धर्मकृत्यानें पुण्य लागते, पण राष्ट्रास त्यायोगें जो प्रत्यक्ष लाभही होतो, ते पाप टाळता येत नाहीं ! याचसाठीं आम्ही दमडीचा देखील राष्ट्रीय वा अैहिक लाभ असा ज्या धर्मकृत्यानें साधणें अशक्य आहे आणि म्हणूनच जे अगदी निष्काम, अगदी पूर्णपणें निकम्मी, अशी भक्ति केल्याचें पुण्य आमच्या पदरीं पाडूं शकते असें हे दोन हजार सत्यनारायणांचें धर्मकृत्य शोधून काढलेलें आहे. ह्या महान् व्रताची मूळ प्रतिज्ञाच अशी करावी लागते, मुख्य सकल्पच असा सोडावा लागतो कीं, ' हे पांचपन्नास हजार रुपये मी अगदीं निष्काम नी निकम्म्या कृत्यातच देवाचे नावें खर्चीन; दोन हजार अनाथ हिंदु लेंकराच्या हृदयातही नारायणाची भावना मला ठेवतां येअील, त्या अर्भकांना संतोषविण्यातच नारायणाचा संतोष मानता येअील. नरांतच नारायणाची अभिव्यक्ति, प्राणप्रतिष्ठा अत्यधिक उत्कटत्वानें संभवते हें भगवद्वचनही मला स्मरतें—पण तरीही मी ते कृत्य, उपयुक्त असल्यामुळेंच टाकाअू समजून, ताब्यांच्या निर्जीव अशा दोन हजार गडव्यांनाच देवाचें प्रतीक मानणार, नी त्या गडव्यांनाच नारायण म्हणून पुजणार, फुलें, नैवेद्य अर्पिणार !! जी कामास येअील ती भक्ति कसली ! ती सकाम, हिणकस ! जी अगदीं निष्काम, अगदीं निकम्मी, ती भक्ति खरी !!

गयाळपणात गोरक्षणकारांनीं जसा तो एक जागतिक अुच्चाक पटकावला; दमडीचा देखील लाभ ज्यायोगे साधणारा नसल्यामुळें जे सर्वस्वीं निष्काम, अगदीं पूर्णपणें निकम्मी आहे, असें दोन हजार सत्यनारायणांचें धर्मकृत्य शोधून काढण्यात जसा नारायणमहाराजानीं हा दुसरा जागतिक अुच्चाक पटकावला; तसाच मुंबईचे चाभार पुढारी श्री. देवरुखकर यानींही धर्माच्या सत्यस्वरूपाची व्याख्या करण्याच्या कार्यी तिसरा एक अुच्चाक पटकाविला आहे ! अुच्चाक पटकावण्याची हिंदुस्थानात सध्यां एक साथच आली आहे !

वेद मानील तो वैदिक धर्म, कुराण म्हणेल तो मुसलमान धर्म, बायबलांत आहे तो खिश्चन धर्म, अशा अनेक विचित्र नी बुद्धिहीन व्याख्या आजवर धर्म शब्दाच्या झाल्या. पण बुद्धीला वेदांतलें वा कुराणातलें वा बायबलांतील कांहीं पटलें नाहीं, प्रत्यक्षानें धडधडीत खोटें पडणारें विधान ह्या पुस्तकांमध्यें सांपडलें, तरी तोही

धर्म मानायचा काय? या अडचणीमुळें धर्माच्या वरील व्याख्या फोल ठरत. पण आता देवरुखकरानीं धर्माची अशी अेक सुटसुटीत, बुद्धीला ग्राह्य, प्रयोगक्षम व्याख्या केली आहे कीं, ती अगदीं अेखाद्या बाजारभावासारखी रुपये–आणे–पैत रोखठोक मोजून घ्यावी द्यावी!

मोक्ष-मुक्ति, स्वर्ग-नरक, द्वैताद्वैत, फार काय, देव आहे कीं नाहीं, अशा कठीण नी शुष्क सालपटात नी कवचांत धर्माचा गीर आजवर बंद झालेला असल्यामुळें तीं सालपटें नी कवचें सोलण्यात नी फोडण्यातच मनुष्य बेजार होई; धर्माचा जो सरस गीर तो हातीं येण्याच्या आधींच मनुष्य मरून जाई. पण देवरुखकरांनीं केलेल्या धर्माच्या व्याख्येची ही गंमत आहे कीं, तिच्या मंत्रोच्चारासरशीं मोक्ष-मुक्ति, देव-देवताच्या शुष्क नरोट्या, कवच्या नी सालपटें झटकन् आपोआप गळून धर्माचें खोबरें तेवढेंच अल्गत हातीं येतें. खरोखरच देवरुखकरानीं धर्माचें अगदी खोबरें केलें!

त्यांनीं मुंबईस एका व्याख्यानांत सांगितलें कीं, 'हिंदु धर्मास मी सोडणार; मुसलमानी, खिस्ती, वा कोणचाही दुसरा धर्म स्वीकारण्याच्या आधीं मी मुख्यतः हें पाहीन की, त्या धर्मात गेल्यानें आम्हास आज मिळालें आहे, त्याहून शेंकडा अधिक प्रतिनिधित्व, शेंकडा अधिक मते विधिमंडळात मिळतात कीं नाहीं? ज्या धर्मामुळें विधिमंडळांत अधिक मतदारी आम्हांस मिळेल, तो धर्म मी स्वीकारणार!'

म्हणजे देवरुखकरास जो शेंकडा अधिक मतदारी देईल तो धर्म, तो स्वीकारणीय धर्म, खरा धर्म!

वा रे वा! धर्माची कशी काटेकोर व्याख्या, कशी बावन्नकशी कसोटी शोधून काढली आहे ही! जो मुक्ति देईल तो, जो देव दाखवील तो, जो आत्मविकास करील तो, कुराणात वा पुराणात आहे तो, अशा गौडबंगाली छा-छूंच्या व्याख्या-मुळें धर्म म्हणजे नक्की काय हें एकासही कळत नव्हते. कारण आत्मा काय, मुक्ति काय, देव काय, हेंच कळणें कठीण! त्या व्याख्या, कसोटी, तीं धर्म मोजायची मापेच जर धुक्याचीं घडलेली तर धर्म तोलून, तासून, पारखून आजवर घेताच येत नसे यात काय आश्चर्य!

पण आता ती अडचण संपली. अगदीं अंकगणितीय काटेकोरपणे, अगदी दरसाल दरशेंकड्याच्या हिशोबी कसोशीनें आतां धर्म पारखून घेतां येईल. तुझा

धर्म किती पैशा पासरी बोल, असें आता रोखठोक विचारतां येतें ! खरा धर्म कोणचा ? तर देवरुखकरास शेंकडा अधिक मतदारी देईल तो ! अधिकांत अधिक शेंकडा मतदारी बौद्ध होऊन मिळेल तर बुद्ध धर्म खरा; खिश्चन होऊन मिळेल तर खिश्चन धर्म खरा; मुसलमान होऊन मतदारी शेंकडा अधिक मिळेल तर मुसलमानी धर्म खरा !!!

बघूं या आता देवरुखकरमहाशयांनीं पुकारलेल्या या लिलावात कोण अधिक बोलतो तें,–बुद्ध, की जीजस, कीं महंमद !

धर्माचें निश्चित सत्यस्वरूप ठरविण्याच्या आजपर्यंतच्या सार्‍या प्रयत्नावर ताण करून देवरुखकरानीं जागतिक अुच्चाक पटकावला खरा !

पण अेक गोष्ट मात्र त्याच्या धर्मनिर्णयाच्या या युगातरकारी व्याख्यानांत जरा घोटाळ्याची वाटते. 'ज्यात आम्हास अधिक प्रतिनिधित्व, विधिमंडळांत अधिक मतदारी मिळेल, तो धर्म मी स्वीकारीन,' अशी महनीय नी महोदार घोषणा केल्या-नतर ते जे लगेच म्हणाले म्हणतात कीं, 'मी सध्यां कुराण नी बायबल आणून अभ्यासीत आहे' त्या वाक्याचा अर्थ काय ? का त्याच्या व्याख्यानाचें प्रतिवृत्त छापण्यांत तें वाक्य त्याच्या तोंडी चुकून घातलें गेलें ?

'माझा धर्म स्वीकारतांच मुंबअी विधिमंडळात किवा अमक्या तमक्या जिल्हा-बोर्डात अमुक शेंकडा मतदारी मिळेल,' असें कुराणात वा बायबलात कुठेंतरी सागितलेलें असलेंच पाहिजे अशी का देवरुखकराची समज आहे ? कोणचा धर्म स्वीकारला असता मुंबअी विधिमंडळात शेंकडा अधिक मतदारी मिळते, याची माहिती त्यांना बिचारा महमद वा मनु वा जीजस कशी पुरविणार ? ती त्यांनीं कुराणाच्या पत्त्यावर न मागवितां गव्हर्नमेंट हाऊस, बॉम्बे ( पोलिटिकल डिपार्टमेंट ) या पत्त्यावर मागवावी !

पण ज्या अर्थी श्री. देवरुखकर प्रभृति मडळींनीं बायबल-कुराणाची अेकेक प्रत आणविलीच आहे, त्या अर्थी त्यानीं ती समग्र वाचावी हेंच अिष्ट. कारण हिंदु धर्माप्रमाणें आमच्या मुसलमानी धर्मात वा खिस्ती धर्मात विषमता अशी नाहीच, आमचा धर्म सर्व माणसें समसमान मानतो, असें जो तो मौलवी नी मिशनरी जे गरजत राहिला आहे, तें किती सत्य आहे, तें तरी त्यांना कळून चुकेल ! दुसरे तिसरे प्रश्न सोडले तरी त्यांनीं गुलामगिरीची प्रथा त्या धर्मांनीं संमतिली आहे कीं

नाहीं येवढें जरी पाहून ठेवलें तरी मानवी समतेचा टेंभा त्या धर्मांनाही मिरविण्याचा किती हक्क आहे हें स्पष्ट होईल ! मुसलमानी धर्माप्रमाणें, अेकाच नव्हे तर हजारों माणसांना, गुलाम म्हणून भर बाजारात वांगीं विकावीं तशीं माणसें, मुसलमान बादशाह, अमीर, मौलवी तर काय, पण प्रत्येक प्रतिष्ठित घरधनी विकत देअू घेअू शकतो. मुस्लीम सेनापतींनी जिकलेल्या लढायांतील सारे पाडाव केलेले लोक त्यांचे गुलाम म्हणून त्याना धर्माज्ञेप्रमाणेंच धरून नेण्यास प्रत्यवाय नाही. आणि त्याप्रमाणें आफ्रिका, अेशिया, यूरोपमधील हजारो बिनमुसलमानी, म्हणजेच 'काफर' स्त्रिया-पुरुष, बाल-बालिका मुसलमानानीं गुलाम करून विकलेल्या आहेत, राबविलेल्या आहेत, ह्याची मुसलमानी अितिहासातील पान नी पान साक्ष देत आहे. जीं माणसें गुलाम म्हणून पाडाव झाली, ती धर्मशासनाप्रमाणेंच त्याच्या धन्याची 'मत्ता'—जसे पशु तशी मत्ता—होअी. पुरुष गुलामाला बायकोचा हक्क नसे, स्त्री गुलामाला नवऱ्याचा हक्क नसे. म्हणजे त्यांना कौटुंबिक जीवनाची स्वतंत्रता नसे. त्यांचीं मुलें त्याच्या धन्याची मत्ता, जशी आपल्या गोठ्यातील गायींचीं वासरें आपली मत्ता असते, त्या गायीबैलांची नसते. गुलामाच्या हव्या त्या मुलास धन्यानें घरच्या कोंबडीच्या पिलासारखे विकावें, राबवावें, देअून टाकावें. गुलामांना घर, दार, पैसा स्वतंत्रपणें ठेवण्याचा हक्क नसे. थोडक्यांत म्हणजे तीं नैर्बंधिक दृष्ट्या (legally as such) माणसेंच रहात नसत ! अशा रीतीनें लक्षावधि स्त्री-पुरुषाच्या समानतेच्या तर सोडाच, पण माणुसकीच्या हक्कासही नाकारणारी ही गुलामगिरीची प्रथा मुसलमानी वा खिस्ती धर्मात सरसहा संमतिलेली आहे ! त्यांतही या दोन शतकांत ती दुष्ट प्रथा जी बंद पाडली ती खिस्त्यानीं पाडली; मुसलमानी धर्मानें नव्हे ! मुसल्मानी राष्ट्रांना गुलामगिरी बंद करणें भाग पाडावें लागलें ! हा इतिहास शाळाशाळातील क्रमिक पुस्तकें देखील घोकीत आहेत; अितकी ही गोष्ट निर्विवाद आहे. आणि ह्या अेका अुदाहरणावरूनसुद्धा मुसल्मानी वा खिस्ती धर्म वा धर्मशासन सर्व माणसांना समान मानतें, विषमतेचा त्याना स्पर्शसुद्धा झालेला नाही, ही घमेंड किती खोटी आहे हें उघड होणारें आहे ?

तेव्हां श्री. देवरुखकरांनीं सर्व मनुष्यमात्राची समता, धर्मभोळेपणापासून संपूर्ण अलिप्तता, धर्मपुस्तकांच्या पुराणाचीं वागीं प्रत्यक्ष व्यवहारांत खातां येतात ही आशा अशा कोणच्याही हेतूनें महंमद वा जीजस वाचावयाची तसदी न घेतली तरी चालेल. धर्म म्हटला कीं घरोघर मातीच्या चुली ! जिकडे तिकडे पुराणाचीं

वार्गी पुराणांत,—कुराणाचीं कुराणात ! ख्रिश्चन-कॅथोलिकानीं ख्रिश्चन-प्रोटेस्टंटांच्याच उडविलेल्या भयंकर कत्तली नी केलेला धर्मोन्मादी अमानुष संहार नी हाल्हाल वाचा, नी मग समतेच्या नी सहिष्णुतेच्या गोष्टी बोला !

तेव्हां, श्री. देवरुखकरांनीं समतेच्या कसोटीवर खरा धर्म कोणता तें ठरविण्याचा वेडा नाद सोडून देऊन त्याच्यापुरती त्यांनीं जी फक्कड व्याख्या शोधून काढलेली आहे, आणि धर्मशास्त्रीय शोधात जागतिक अुच्चाक पटकावला आहे, तीच त्यांनीं अुचलून धरावी. खरा धर्म कोणचा ? स्वीकारणीय धर्म कोणचा ? तर जो देवरुख-करास अधिक मतदारी मुंबई विधिमंडळात मिळवून देअील तो ! आज मुसल-मानास ती मिळते, तर व्हा मुसलमान ! अुद्या हिंदूंचा दिवस आला, त्यांना अधिक मतदारी मिळाली, व्हा पुन्हा हिंदु ! हा खाक्या खरा !!

# नववा किरण

मानवजातीवर येणाऱ्या अुत्पाता—अपघातादिक संकटांपासून बचाव करण्याचे अुपाय शोधण्यासाठीं अज्ञानाच्या धार्मिक छाछूंची वाट सोडून विज्ञानाच्या कार्य-कारणभावाची वाट चोखाळूं लागताच त्यांना मनुष्यावर कोसळणाऱ्या अेकेका अरिष्टावर कधींही न फसणारा असा अेकेक अमोघ अुपाय कसा सापडूं लागतो पहा !

## पाण्यांत न बुडणारीं नौयानें

आजवर महासागरांत किंवा नद्यामध्यें लहानमोठ्या नौका, तारवें, प्रचंड बाष्पनौका बुडून कोटयवधि माणसें पाण्यात तडफडत मेली असतील! समुद्र-देवतेला प्रसादण्यासाठीं नारळ फेंकफेकून, मचवे हाकारतात; पण तरीही तारूं अेकदा का फुटलें कीं प्रार्थनाचे पर्वताअेवढाले बोळे जरी त्यात कोंबले तरी तें भोक बुजत नाहीं, हा अनुभव मनुष्यास आज हजारों वर्षे सारखा येत आहे. समुद्रांत तारवें बुडण्याचें बंद करणारा अुपाय अज्ञानाच्या धार्मिक छा-छूंत सापडला नाहीं तो नाहींच! परंतु ती झालेली दिशाभूल सुधारून समुद्रांत तारवें बुडतात त्याचीं सृष्टिशास्त्रीय कारणें शोधण्यासाठीं विज्ञानाची खरी दिशा धरतांच तो अुपाय मनुष्याच्या आटोक्यांत आला.

---

मनोहर मासिक, मार्च १९३६

नौविद्येत हें आश्चर्यकारक परिवर्तन करणारा शोध अमेरिकेंतील विदरस्पून-साहेबांनीं लाविला असल्याचें अधिकृत वृत्त अलीकडेच प्रसिद्ध झालें आहे. त्याच्या युक्तीप्रमाणें तारवें नी आगनावा बाधल्या गेल्या, तर पाण्यांत त्या बुडूं शकणार नाहींत, असें त्यानी प्रयोग दाखवून सिद्ध केल्याचें कळतें. त्यानीं तारवाच्या अेका खोलीच्या खाली अेक मोठें भोक पाडलें. त्यातून समुद्राचें पाणी सों सों करीत आत घुसूं लागताच त्याच्या नव्या वायुयंत्राच्या साहाय्यें त्यानीं अितका वायु आंत भरला कीं, त्या दाबासरशीं तें सारें पाणी परत समुद्रात खाली दडपलें गेलें. भोंक तळाशीं तसेंच्या तसेंच असता पोलादी पत्र्यासारखा तो वायूचा दाब त्या भोकाचें तोंड बंद करून राहिला होता. त्यावरील दाबामुळें पाण्याचा बिंदूही भोंकातून वर येअूं शकेना. अशा प्रकारें जल आणि वायु याची परस्पर झुंज लावून दिल्यामुळें अेखाद्या भग-दाडासरशीं मोठमोठीं तारवें नी आगनावा दिसतां दिसता समुद्रांत बुडण्याचें भय नाहींसें झालें ! ही युक्ति जर पूर्णपणें यशस्वी टरली तर कोट्यवधि रुपयाची मत्ता, वित्त नी प्राण वाचवीत रहाण्याचें श्रेय विदरस्पून यानीं सततचें संपादिल्यासारखेंच होअील ! ज्या विज्ञानानें समुद्राच्या तळाचा ठाव घेअून तेथील संपत्ति घर आणली, समुद्राच्या तळाशीं प्रवास करणाऱ्या पाणबुड्या शोधून काढल्या, आगनावा बन-विल्या, तें विज्ञान हजारों प्रवाश्यानीं गजबजलेल्या टिटॅनिकेसारख्या महानौकांना सहजासहजीं गट्ट करण्याची समुद्राची खोडही आज ना अुद्यां मोडूं शकेल. धार्मिक छाछूंनें मात्र त्यापैकीं अेकही गोष्ट साध्य होणें शक्य झालें नाहीं, कधींही होणार नाहीं. वेद, कुराण, पुराण वाचा किंवा वाचूं नका, तारवाला भगदाड पडून समुद्र आत घुसला कीं, भट, पाद्री, काजी प्रभृति त्यांच्या वेद–कुराण–बायबलांच्या प्रतीं-सह पाण्यांत बुडणार ! पण भगदाडानींसुद्धा पाण्यात तारवें न बुडण्याची वैज्ञानिक क्लृप्ति सापडली कीं जन्मात प्रार्थना, निमाज न पढणारे 'नास्तिक'ही तरणार ! हा ठाम सिद्धान्त !

असाच एकदां केसाळपणा नी काळेपणा घालविण्याचा अुपाय कोणीं लवकर काढील काय ? ब्रम्ही, चिनी, जपानी प्रभृति मगोलियन लोकाची त्वचा सुवर्णपीत असते. विशोभित केंसाळपणा तिच्यावर मुळींच नसतो नी तरीही जे केंस सुशोभित ते त्यांच्या मस्तकावर विपुल असतात. तेव्हां केंसाळपणा घालविण्याची सोय निसर्गात आहे हें सिद्धच आहे. ती सोय कशी साधतां येते तो कार्यकारणभाव अजून मनुष्यास कळला नाहीं अितकेंच. वास्तविक पहातां युरोपियन स्त्री-पुरुषांच्या

त्वचेचें मार्दव, शोभा नी लावण्य केसाळपणानें फार अुणावलेलें असतें. त्यांचें लक्ष हा विशोभित केंसाळपणा घालविण्याची युक्ति शोधण्यात पूर्वीच वेधावयास हवें होते. गोरेपणाची गोष्ट थोडी निराळी. कारण थंड वायुमानामुळें युरोपीय रंग अुपजत गोरा. त्यामुळें काळा रंग घालविण्याचा प्रश्न आहे अुष्ण वायुमानामुळें ज्याचा रग हळुहळू काळा पडत आहे त्या हिंदुस्थानादिक देशाचा. पण आमचे ते देश अजूनही धार्मिक छाछूंच्या अज्ञानयुगातच गुरफटलेले. सृष्टिनियम नी भौतिक कार्य-कारणभाव समजून घेअून त्याच्या आधारें सृष्टीवर मनुष्यास शक्य ती ती सत्ता गाजविण्याचें सामर्थ्य देणारें विज्ञानयुग जेव्हा हिंदुस्थानात अुगवेल, तेंव्हा कोणी हिंदी वैज्ञानिक आमचीं सगळीं मुलें गोरींपानच हटकून कशीं निपजतील याचा अमोघ उपाय खाडकन् शोधून काढील, यात आम्हांस फारसा संशय वाटत नाहीं. कारण सृष्टींत तशी सोय आहे हे प्रत्यक्ष दिसत आहे.

सृष्टिघटनांचे वैज्ञानिक कार्यकारणभाव शोधीत युरोप कसकसें प्रगत नी प्रज्ञ बनत चाललें आहे हें काहीं ताजे दाखले देऊन आम्हीं वर जसें दाखविलें, तसेंच सृष्टिघटनाचे धार्मिक छाछूंतले अज्ञानिक कार्यकारणभाव शोधीत आम्ही कसे अधिकाधिक पढतमूर्ख बनत चाललो आहोंत ह्याचेही त्याच गेल्या वर्षातले कांहीं दाखले खालीं देत आहोंत.

## धार्मिक छाछूंचे कार्यकारणभाव

बिहारमध्यें भूकंप का झाला? ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्यादिक लोक भंगी, धेड, डोम यांना शिवत नाहींत म्हणून! क्वेट्टयाला भूकंपानें अेका रात्रींत वीस हजार माणसे मुलांबाळांसुद्धां जिवंत पुरून कां टार केली? मनुष्यांच्या ‘पापा’मुळें देव ‘रागावला’ म्हणून! कोणच्या मनुष्यांनीं त असें भयंकर कोणचें पाप केलें? त्याचा नक्की निर्णय वर्ध्याच्या प्रार्थनामंदिरातील भजनानंतर अैकू येणारा ‘आंतला आवाज’ लवकरच सांगणार आहे! दाभोळें येथें महारवाड्यांत भयंकर अशी पटकीची सांथ कां अुद्भवली? भूकंपाचा वरील धार्मिक कार्यकारणभाव जितक्या निःशंक धिटाअीनें वर्ध्याच्या मगनवाडींतील सतानें सागितला तितक्याच निर्णायक स्पष्टपणें दाभोळ्याच्या महारवाड्यातील संतिणीनें त्या पटकीच्या साथीचा कार्यकारणभावही सांगितला कीं, ‘मरीआअीचे गेल्या तीन वर्षाचे तीन रेडे तुम्हीं अजून बळी दिले नाहींत म्हणून! म्हणून पटकीची सांथ आली!’ पटापट माणसें मारणाऱ्या

ह्या पटकीवर लस टोचून घेअूं, औषधे पिअूं, का काय अुपचार करूं ? 'देव-ऋषीण' म्हणाली, 'देवाला गाऱ्हाणें घाला ! टोंच वा औषधपाणी करूं नका. शेणाचे तीन पट्टे मी घराभोंवती मंत्रून ओढत्यें. त्या पटकीच्या 'बा' च्यानें बी तें ओलाडून घरात येववणार नाहीं !"

वरील प्रश्नोत्तरें काहीं चेष्टेचा विषय नाहींत बरें ! तीं त्या त्या प्रसगींची एक अत्यंत गंभीर शास्त्राज्ञा आहे ! एकाद्या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धांतासारखीं तीं ती वाक्यें त्या त्या धार्मिक तज्ज्ञानीं निःशंक गांभीर्यानें अुच्चारली आणि त्याना वेद-वाक्यांप्रमाणें विश्वासणाऱ्यांची संख्या आजही हजारानी मोजतां येअील ! ही धार्मिक छाछूं चेष्टा असती तर तिला कोणीं कवडीचेंही मूल्य दिलें नसतें. पण ती चेष्टा नाहीं; ती आज लाखों भोळसटाची प्रामाणिक निष्ठा आहे ! ही धार्मिक छाछूं अितकी गंभीर आहे म्हणूनच तर अितकी भयंकर वाटते. तिचें गांभीर्य हेंच राष्ट्राच्या बुद्धिभ्रंशाचें मापन ठरते !

## विडी आणि ब्रह्म ह्यांचा कार्यकारणसंबंध

तुम्ही सारा वेद्वेदान्त, शाकरभाष्य वाचून, विंचून पालथें घातलें असाल ! फार फार तर तुम्हाला ब्रह्म नि माया याचा संबंध कळला असेल ! पण जगात आजवर कोणाला तरी ब्रह्म आणि विडी याचा संबंध कळला आहे का ? प्रतिज्ञेवर सागता येअील कीं, नाहीं कळला ! मग अैका तर. असें निगूढ तत्त्व गुरुकृपे-वाचून कसलें कळणार ? म्हणून प्रथम समित्पाणिर्गुरुमेवाभिगच्छेत् ! यास्तव वऱ्हाडात अेक जिज्ञासू श्रीमत् परमहस तुकडोजीबुवा यांच्या चरणदर्शनार्थ जाअून अलीकडेच विनविते झाले कीं, "महाराज ! आपण ब्रह्मज्ञानी, कवि, परमहंस. आपले हजारों शिष्य. आपण अेक मोटा यज्ञ करविलात. हजारों लोकाना अन्नदान दिलेंत. अशा आपल्यासारख्या थोर ब्रह्मज्ञान्यानें सतत विड्या प्याव्या हें कसें काय ? विडी फार प्यायल्याचा देहावर फार वाअीट परिणाम होतो असें म्हणतात !" या प्रश्नास अैकून श्रीमत् परमहंस तुकडोजीबुवा तें गूढ कसें उकलवून दाखविते झाले म्हणता ? तें अमरावीच्या 'अुदय' पत्रात त्याच्या बातमीदारानें वर्णिलेल्या माहितीवरून सांगूं या. महाराज तुकडोजीबुवा अगदीं पहिल्या प्रतीचे विडीपिअू आहेत. भक्तगण विडीमागून विडी चेतवून देण्यात अव्याहत गुंतलेले असतात कारंज्याच्या फवाऱ्याप्रमाणें त्याच्या मुखांतून सतत धुराचा अखंड लोट वाहत

असतो. प्रस्तुत बातमीदारानें श्री. नानाराव अमृतकराच्या बंगल्यावर वरील प्रकारचे प्रश्न विचारले. महाराज तुकडोजीबुवा म्हणाले, " अहो, विडीचा देहावर वाईट परिणाम होणार तर होवो ! देहाचें काय ? बोलून चालून तो नाशिवंत ! देह पडला तर पडो; काय चिंता ! " बातमीदार म्हणाला, " सत्याकरितां, धर्माकरितां देह पडला तर पडो, असें म्हणणें योग्य ठरेल; पण विडी पिण्यापायीं देह पडो, असें म्हणणें योग्य कसें ? उद्या दारुडाही तसेंच म्हणेल ! " त्यावर महाराज तुकडोजी-बुवा म्हणाले, " तुम्ही विडी विडी म्हणजे काय समजतां ! ब्रह्मज्ञानाचा प्रवाह तोच विडीचा धूर ! विडीचा धूर ब्रह्मज्ञान घेऊन बाहेर पडतो ! तो औतींभोतीं वहातो तसें ब्रह्मज्ञान फैलावतो ! ऐका, भजन !—

**" बिडीमें क्या मजा है ।**
**तुमको खबर नहीं ॥**
**नाभीसे ऊठ पावे ॥**
**ब्रह्मांड घूम पावे ॥**
**झुरझुरके दम लगावें ।**
**तुमको खबर नहीं ॥ "**

बातमीदार म्हणतो, " बुवांचें हें भजन ऐकणाऱ्या अनेक भाबड्या भक्तांना सहजच वाटते, विडीच्या ह्या धुरामध्यें ब्रह्मज्ञानाचा काहीं गूढ अर्क असेलही रसरसलेला ! नाहीं कोणीं म्हणावें ! त्यांना यातही दैवीपणा दिसतो ! " त्यावर आमचें इतकेच म्हणणें कीं, परोपकारात जो सत्पुरुष रत आहे तो विडी पितो म्हणूनच कांहीं असत्पुरुष होत नाहीं. जोंवर कोणी दुसऱ्याच्या विड्या चोरीत नाहीं किंवा दुसऱ्याच्या तोंडात त्याचा धूर बळें बळें कोंबीत नाहीं, तोंवर ती एक तुच्छ वैयक्तिक हौस म्हणूनच दुर्लक्षिणें युक्त. पण स्वतःच्या विडी पिण्यासारख्या ल्हानमोठ्या व्यसनांचें समर्थन ब्रह्मज्ञानाच्या बातानीं करण्यास ज्या लोकात मोठे-मोठे महंत धजतात आणि त्यांच्या त्या धूर्त वा मूर्ख शब्दांतहि 'दैवी गूढ' भक्तजन शोधीत बसतात, त्या लोकाची बुद्धि, विवेक नी सृष्टिनिरीक्षणशक्ति धार्मिक छाछूंच्या अफूनें किती मूर्छिलेली असते तें मात्र लक्षात घेतलेंच पाहिजे. ब्रह्म-ज्ञान्याच्या विडीचा धूर म्हणे ब्रह्मज्ञान घेऊन पोटाबाहेर पडतो ! वा रे ब्रह्मज्ञान ! वा रे ब्रह्मज्ञान्यांचें सृष्टिज्ञान !

## सौभाग्यकांक्षिणी कुमारी कालवडीचें लग्न

धार्मिक छाछूंच्या कार्यकारणभावाचा आणखी अेक ताजा दाखला म्हणून शिक्षितांनीं गजबजलेल्या भर अुमरावती नगरात घडलेला अेका कालवडीचा—अेका गोऱ्हीचा—ह्या लग्नसमारंभ पहा ! कोणीं मिस् मेयोनें ही बातमी सांगितली असती तर आम्हीं तिला आमच्या समाजाची टर करण्यासाठीं तिनें ती बनावट गोष्ट रचली असली पाहिजे, अितके का आम्ही दूधखुळे आहोत, असें म्हणून चांगली फटकारली असती. पण डॉ. कृ. दा. वऱ्हाडदेशपाडे याच्यासारख्या अेका स्वाभिमानी स्वधर्मबंधूनेंच ती सहीसुद्धा प्रसिद्धिली असल्यामुळें ती नाकारताच येत नाहीं. ती घटना अशी : अमरावतींतील अेका घराण्यात भूतबाधा होत असल्याचा संशय आला. त्यावर काय अुपाय योजावा ते ठरविण्यासाठी शास्त्रीमंडळींस पाचारलें. धर्मसिधु, निर्णयसिधु प्रभृति त्रिकालज्ञ सनातन ज्ञानाच्या विश्वकोशांना चाळूनपाखडून निर्णय देण्यात आला कीं, या भूतबाधेला अेक नदिकेश्वरच काय ते टाळूं शकतील. नंदिकेश्वरास प्रसादविलें पाहिजे. त्याचा उपाय पाहाता अेक तदर्थक व्रत सापडलें ते हें कीं, शंकरभगवानाचा नंदी अजून कुंवार, त्यामुळें असतुष्ट. तेव्हा त्याचें प्रतीक कल्पून जर कोण्या वृषाला वरस्थानीं योजलें नी कालवडीला वधूस्थानीं, आणि त्यांचें यथाविधि लग्न लावलें, तर नदिकेश्वर प्रसन्न होतात. आणि त्या विशिष्ट विधीच्या पुण्यानें अशा प्रकारचीं भुतें पळून जातात. ह्या निर्णयानुरूप अेक ' सुंदर, खाशी, सुबक, ठेंगणी ' गोऱ्ही आणि तिला एक ' तरुण, कुलीन गोऱ्हा ' असा वर पसंत करण्यांत आला. ह्या गोऱ्ह्यामध्यें नंदीची प्राणप्रतिष्ठा होअून त्या ' नदीरूपिणे वृषाय ' लग्नमडपात मिरवत आणलें. लग्नाच्या आमंत्रणपत्रिका सर्वत्र वाटल्या होत्या. त्याप्रमाणें त्या बुद्धया अुभारलेल्या मोठ्या मडपांत पाहुणे मंडळींचा थाट जमला. सीमंतपूजन प्रभृति विधि यथासाग मंत्रघोषांसह अुरकण्यात आले. गोरजमुहूर्त साधून तीं नरमादी लग्नासाठीं मंडपांत आणलीं गेलीं ! आपापल्या शिंगाहीं नी शेपटांहीं सुशोभित अशीं तीं वधुवरें मुंडावळी बांधून वरमाला घेऊन अुभीं असतां ' सावधान शुभ लग्न ! ' अशी द्विजांहीं चेतावणी दिली आणि मंगलाष्टकाच्या शेवटच्या चरणासरशीं वाद्यांचा कडकडाट होत्साता तो विवाह संपादिला गेला !! भटांना दक्षिणा दिल्या. वरवधूपक्षांना अहेर झाले. भोजनाच्या पंगती झडल्या. तो जांवअी नंदी नी ती सौभाग्यवती कालवड गोरक्षण कार्यालयातील गोठ्यात मधुमीलनाचे सुख सध्यां लुटीत आहेत ! त्या गोठ्यांत

गाद्यागिरद्या अंथरलेले पलंगही त्याना पुरविले आहेत किंवा नाहींत तेवढी माहितीही डॉक्टरमहाशयानीं प्रसिद्धिली असती तर बरें झालें असते !

महारादिक आमच्या स्वधर्मबंधूंच्या मानवी वरवधूच्चीं लग्ने लावण्यास जे भट आपलें सोवळें विटाळेल म्हणून जात नाहींत आणि जे मंत्र व त्याची पवित्रता बाटेल म्हणून म्हणत नाहींत, ते भट त्या बैलाच्या लग्नाला गेले, त्या पशूच्या अंगावर शालीपिताबरासह हात फिरविते झाले, ते संस्कृत मंत्र म्हणते झाले; आणि हे सारें अेक धार्मिक गंभीर सस्कार म्हणून ! आमच्या धर्माचें विडंबन आमचा कट्टर धर्मशत्रूदेखील यापेक्षां अधिक आचरटपणें काय करू शकेल ? धार्मिक छाक्र्चें हे अज्ञानयुग सपून हिंदुस्थानांत विज्ञानयुग कधीं अुगवेल ?

# दहावा किरण

## पुनः एकदां गाय

### हानिकारक धर्मभावना

'महाराष्ट्र-शारदें'त आम्हीं गाय हा निबंध लिहिल्यापासून गोरक्षण कोणच्या दृष्टीनें केल्यास राष्ट्राचे हितास पोषक होअील याची पूर्वी कधींही झाली नव्हती इतक्या कसोशीनें नि उत्कटपणें चर्चा चालू झाली.

परंतु गायीविषयीं त्या पहिल्या लेखापासून आम्ही आंजवर जे दहा पाच लेख लिहिले त्या सर्वांमध्यें आमचा मुख्य हेतु गोरक्षण संस्थाची सुधारणा किंवा त्यांच्या सुधारणेमुळें राष्ट्राचें धन किती कवड्या वाढूं शकेल इतकाच काय तो नव्हता. आपल्या अनेक 'धार्मिक' छापाच्या समजुती, श्रद्धा, आचार, व्रतेंवैकल्यें, रूढी ह्यांच्या मुळाशीं पूर्वी केव्हां तरी कांहींतरी लोकहितास उपयुक्त असा हेतु असला पाहिजे; त्यांच्या आचरणामुळें त्या त्या काळीं कांहीं प्रकरणीं तरी लोकहित साधलेंही असेल; परंतु हजारों वर्षांमध्यें जगांत ज्या उलाढाली झाल्या, त्यांमुळें आपल्या हिंदु राष्ट्राच्या परिस्थितींत जे बदल झाले, मनुष्याच्या ज्ञानविज्ञानांत युरोपअमेरिकेसारख्या प्रत्यक्षनिष्ठ नि प्रयोगशील बुद्धिवाद्याच्या यत्नांतही गेल्या दोनशें वर्षांत जी आश्चर्यकारक वाढ झाली, त्या उलाढालींनीं बदललेल्या परिस्थितीला तोंड

---

महाराष्ट्र-शारदा, मार्च १९३६

देण्यासाठीं त्या वाढत्या विज्ञानाच्या कसोटीवर त्या आमच्या धार्मिक छापाच्या रूढींना नी भावनांना पुन्हा एकदां तासून घासून घेण्याचें, त्यांची बोथट झालेली धार पुन्हा एकदां तीक्ष्ण नी पाणीदार करण्याचें काम गेल्या दीड हजार वर्षांमध्यें तरी म्हणण्यासारखे असें झालेंच नाहीं.

सगळ्यांत हानिकारक 'धर्मभावना' जर कोणची असेल, तर ती ह्या पुरातन आचारांना वा रूढींना वा समजुतींना आजच्या वाढत्या ज्ञानाची आणि मिळविलेल्या अनुभवाची कसोटी लावताच कामा नये, ही भ्याड भावना होय! त्या साऱ्या पांच हजार वर्षांपूर्वींच्या रूढी नी आचार आहेत. 'अेषः धर्मः सनातनः'!! तन'!! ह्यापुढें कितीही हानिकारक ठरत गेल्या तरी त्या बदलतांच कामा नयेत, त्यांना कसोटी लावणें हाच अधर्म! कारण त्या प्रत्येक आचार नि रूढीवर स्मृतींचा नि श्रुतींचा अेकच ठराविक छाप पडलेला : 'अेषः धर्मः सनातनः'!

त्यांतही जर कोण्या अगदीं सुधारकी शास्त्र्यानें कसोटी लावण्यास अनुज्ञापिलेंच तर ती कसोटी म्हणजे एकच—श्रुतींत वा स्मृतींत वा पुराणात कोणच्या तरी पोथींत तो धर्म सांगितला आहे ना? मग त्यामुळें प्रत्यक्ष व्यवहारांत लोकांच्या अुद्धाराला त्या आचारामुळें खीळ बसली तरीही तो 'अेषः धर्मः सनातनः'

या आपल्या भाबडट वृत्तीमुळें आपले सर्व आचार, रूढीभावना, हें 'धार्मिक' आचारकांड आपल्या जुन्या तीर्थांप्रमाणेंच शतकोंशतकें अुपसा नसल्यामुळें सडून कुजून चालले आहेत. आरोग्यासाठीं, स्वच्छ स्नानापानासाठीं, ज्या नद्या, तळीं, कुडें हितकारक म्हणून पवित्र मानली, तीं अुपसून वारंवार स्वच्छ न ठेवल्यामुळें आज तेच जलाशय क्षेत्रोंक्षेत्रीं घाणीचीं नी रोगाचीं डबकीं होऊन पडले आहेत; तसेच हे अनेक आचार, रूढी, समजुती 'अेषः धर्मः सनातनः' ची पाटी त्यांच्यावर मारल्यामुळें, त्याना अुजळा देणें, अुपसा करणें हेंच पाप ठरविल्यामुळें, आज भाबडटपणाचीं डबकीं होऊन पडलीं आहेत, आमचें धार्मिक जीवन त्यांच्यामुळें कलुषित नि रोगट झालें आहे.

ही स्थिति आपल्याच आचारकांडाची झाली आहे असें मात्र मुळींच नाहीं. ख्रिश्चन, पारशी, ज्यू, मुसल्मान—धर्मांचा छाप ज्यावर पडतो तो तो आचार वा रूढी अपरिवर्तनीय होय, ही खुजट नि कुजट धर्मभोळी समजूत सर्व पोथीनिष्ठ धर्मांतून अशीच हानिकारक ठरलेली आहे! पुराणात काय, कुराणांत काय, वेदांत

काय, अवेस्तांत काय, त्या काळीं त्यांना लोकहितकारक नि त्यांच्या परिस्थितींत अुपयुक्त वाटलेले आचार, समजुती नी किरकोळांतील किरकोळ गोष्टी देखील—दाढी, शेंडी, केंस यांच्या लांबीरुंदीपर्यंत,— अेकाच छापाखालीं ढकललेल्या आढळतात : अेषः धर्मः सनातनः ! परिस्थिति बदलतांच हे धर्मच अधर्म ठरण्याचा, लोकांच्या धारणाचें अुलट मारणासही कारणीभूत होण्याचा संभव आहे, ह्या अत्यंत महत्त्वाच्या सत्याविषयीं त्या साऱ्या धर्मग्रंथांतून दुर्लक्ष झालेलें आढळतें.

ही धार्मिक प्रवृत्ति म्हणजेच धर्मभोळेपणा आणि ती प्रवृत्ति दुसऱ्यावर बळानें लादण्याचा यत्न म्हणजेच धर्मवेडेपणा. जोंवर लोकांतील ही धर्मभोळी नि धर्मवेडी प्रवृत्ति अुच्चाटली गेली नाहीं, तोंवर ते ते लोक प्रगत होत नाहींत, त्यांचें ज्ञान वाढत नाहीं, आणि त्या धर्मग्रंथाचे वेळीं असलेल्या परिस्थितीचे अुलट परिस्थितींत, त्याचे ते 'सनातन धर्म'च त्यांच्या नाशास कारणीभूत झाल्यावांचून सहसा रहात नाहींत. जे लोक हें सत्य ओळखून आपले जुने नि सद्यःपरिस्थितींत नडणारे आचार झटपट पालटून आजच्या ज्ञानविज्ञानपरिस्थितीला जुळणारे नवे आचार अवलंबतात, ते प्रगतिशील ठरून त्या स्थितिशील धर्मभोळया वा धर्मवेड्या समाजावर मात करतात.

## नव्या देवतेची मूर्ति

या कारणामुळेंच युरोपनें गेल्या दोनशें वर्षांत मुसलमानांवर नि हिंदूंवर मात केली. दोनशें वर्षांपर्यंत यूरोपही बायबलच्या दोन पुठ्याचे आत असेंच अडकून कोंबून कुजून राहिलें होतें. पण अकस्मात् अेक स्फोट झाला. तो फ्रेंच राज्यक्रांतीचा नव्हे, तर फ्रेंच बुद्धिक्रांतीचा ! फ्रेंच राज्यक्रांति त्या बुद्धिक्रांतीचा एक अध्याय, अेक अपरिहार्य परिणाम ! फ्रेंच राज्यक्रांतिकारकांनीं अक्षरशः अनेक जुन्या देवता नाकारून नवी देवता घडली नी प्यारिसच्या रस्त्यांतून मिरविली—बुद्धिश्री ! "The Goddess of Reason" ची ! ह्या स्फोटासरशीं युरोप बायबलच्या बंदींतून बाहेर फेकलें गेलें. त्यानें साऱ्या 'अेषः धर्मः सनातनः' ना विज्ञानाचे, बुद्धीचे, सद्यःस्थितीचे कसोटीस लावलें आणि युरोप वैभवाच्या झेपलिनमध्यें आकाशात अुंच अुंच भरारूं लागलें. यूरोपनें विज्ञानाच्या नव्या नव्या शस्त्रास्त्रानीं हिंदूंवर मात केली. आज साराच मुस्लीम देश युरोपच्या टाचेखालीं आहे ! तुर्कानें तेवढें युरोपचें तें विज्ञान अुचललें, तें धर्मभोळेपण नि धर्मवेडेपण सोडलें—म्हणून तुर्क तरी बचावला !

आपल्या हिंदु राष्ट्रासही आजच्या विज्ञानयुगाशीं टक्कर देऊन जर जगणें असेल, तरणें असेल, तर आपणही आतां या 'अेषः धर्मः सनातनः' च्या धर्म-भाबडट नि आचरट म्हणजे निरर्थक आचाराचें स्तोम माजविणारी ही प्रवृत्ति सोडून आपला पांच हजार वर्षांपूर्वी घडलेला वा जडलेला प्रत्येक आचार, प्रत्येक रूढी, प्रत्येक श्रद्धा, आजच्या विज्ञानाच्या प्रत्यक्षावगम्य कसोटीवर तासून, घासून, परीक्षून जी टिकेल तीच ठेवल्यावांचून, न टिकेल ती टाकल्यावांचून, ह्या नवीन परिस्थितीशीं झुंजण्यास अवश्य तीं नवीं शस्त्रें परजल्यावाचून गत्यंतर नाहीं, अशी आमची बालंबाल निश्चिती पटल्यामुळें, आम्ही त्या धर्मभोळ्या प्रवृत्तीस विरोधिण्यास सजलों आहों. आमचा लढा त्या हानिकारक प्रवृत्तीशीं आहे.

## धर्मभोळेपणाचा पूर

त्या धर्मभोळ्या प्रवृत्तीचें अेक अुदाहरणच काय तें म्हणून आम्ही आमच्या गोपूजक गयाळपणास निवडलें. नाहीं तर ती बिचारी गाय आमचें काय खात होती ? मूठभर गवत नि थोडेसें ओखटपाणी !!

धर्मभोळ्या भाबडेपणापायीं आमची तारतम्य बुद्धि किती पंगु झाली आहे ते चवाठ्यावर आणण्याचे कामी आम्हीं निवडलेलें हें गायप्रकरण अपेक्षेपेक्षाही अधिक परिणामकारक ठरत असल्यामुळें आम्ही त्या विषयाची चर्चा आणखी अेक वर्षभर तरी तशीच करीत रहाणार आहोंत. कारण गायीसारख्या अेका पशूला मनुष्याचीच नव्हे तर देवांचीही देवता बनवून सोडणाऱ्या आमच्या ह्या गोपूजक धर्मभोळेपणाचे समर्थनार्थ अग्निहोत्रमंदिरापासून पांजरपोळापर्यंत जी खळबळ अुडून गेली आहे, तीमुळें पाऊस पडतांच नदी, नाले, ओहोळ जसे तुडुंब भरून वाहूं लागतात तसे धर्मभोळेपणाच्या नद्या-नाले-ओहोळाना महान् पूर आला आहे आणि ते जों जों फुगून फुगून वहात आहेत तों तों राष्ट्रीय मनाच्या तळाशीं दडलेल्या भ्रामक समजुतींची नि कुजलेल्या कल्पनाची सारी खळमळसुद्धां वर येऊन, वाहून चालली आहे. अेकदा तो पूर ओसरला नि ती खळमळ वाहून गेली म्हणजे धर्म-निष्ठेचें जीवन स्वच्छ होअून तारतम्य बुद्धीच्या पात्रांत वाहूं लागेल.

आपला प्रत्येक जुना आचार, रूढी नि समजूत आजच्या विज्ञानाच्या कसोटीवर कशी पारखून घ्यावी, आणि आजच्या परिस्थितीशीं टक्कर देण्याची क्षमता येईल

असे कोणते नवे आचार नि रूढी चालू कराव्या, त्याचें दिग्दर्शन करण्यास, त्याचा एक वस्तुपाठ देण्यास, हा गोरक्षणवाद उपयोगीं पडल्यावांचून रहाणार नाहीं.

यासाटींच तो वाद पुढें चालवून म हा रा ष्ट्र–शा र दें तील आमचे मागचे लेख आल्यानंतर त्याना अुत्तर म्हणून गोरक्षणादि संस्थांच्या नि वृत्तपत्रांच्याकडून जे जे भाराभर कोटिक्रम पुढें आले त्यांतील दोनचार विधेयें–आजवर विचारांत न घेतलेली–चर्चिण्यासारखीं या लेखांत चर्चिली आहेत.

## अमेरिकेंतील गोमाहात्म्याविषयीं आमच्या भ्रामक कल्पना !

गायीसारख्या एका पशूला अक्षरशः नि वस्तुतःच देवता समजण्याच्या आमच्या मूर्खपणाचें समर्थन करतांना बहुतेक गोपूजक एकसारखे सांगत सुटतात कीं, "अहो, आम्हीच नव्हे, तर ते अमेरिकनांसारखे लोक देखील गायीस माता म्हणतात, देवता म्हणतात. गोप्रस्थ अमेरिकेंत आम्हांहूनही अधिक प्रमाणांत वाढत आहे. गाय ही अमेरिकेसारख्या अगदीं अद्यावत् विज्ञानाचें आगर असलेल्या राष्ट्रात देखील देवता मानली जाते–म्हणून गाय ही देवता आहे! माता आहे!"

ह्याच्या पुराव्यासाठीं अमेरिकन लेखकाचीं 'Cow is the mother of prosperity,' 'Cow is the foster mother of the human race!' 'Cow feeds our nation' प्रभृति अनेक वाक्यें वरचेवर छापलीं जातात. अमेरिकन नटीचें लावण्य ती गायीचें दूध पितें म्हणूनच टिकतें, अमका अमेरिकन गायीचें दूध हें अत्युत्तम अन्न आहे असें म्हणतो, अित्यादि विधानेंही वारंवार अितक्या बेछूटपणें केलीं जातात कीं, त्यायोगें आमच्या अिकडे वाढलेल्या गायीच्या स्तोमाप्रमाणेंच अमेरिकेंतही गोपूजा सरसहा चालू असावी, असा अेक लोकभ्रम सहजगत्या चहूकडे फैलावत जावा. बहुतेक गोसेवक, धेनुदास, गोभूषण प्रभृति भोळसट मंडळींची तशी समजूत खरोखरीच झालेलीही आहे, हें त्यांच्यांतील अनेक प्रचारक-प्रचारिकांचीं जीं कथाकीर्तनें संभाषणें अैकूं येतात त्यांवरून दिसून येतें.

## गोभक्षक अमेरिका

आतां, अमेरिका आमच्या गोपूजेच्या अर्थीच गोपूजक आहे, आम्ही गायीस ज्या अर्थी देवता मानतों त्याच अर्थी ते अमेरिकनही गायीला वस्तुतःच देवता मानतात. आम्ही ज्या अर्थी तिला माता म्हणतों, त्याच अर्थी अमेरिकन लोक

सरसहा गायीला वस्तुतःच माता मानतात,—ह्या समजुती किती खोट्या आहेत हें दाखविण्याचे आधीं अमेरिकेंतील वा यूरोपांतील कोणच्याही गांवच्या बाजारांत नुसता अेक फेरफटका करताच तुम्हांस काय दृश्य दिसेल तेवढें काय तें पाहून येअूं!

प्रत्येक गांवांत भर बाजार आळींत ज्या ज्या दुकानापुढें सकाळीं अगदीं दाटी अुडालेली दिसेल तें तें दुकान बहुधा मांसविक्याचेंच असणार. आपल्या अिकडे भाजीचीं दुकानें जशीं अगदीं निःसंकोचपणें प्रत्येक मोठ्या आळींत अेकादें आणि बाजारांतून अनेक हारीनें माडलेलीं असतात, तशीं तिकडे मांसाचीं दुकानें ठिकठिकाणीं मांडलेलीं असतात. त्या मासाच्या दुकानातून मुख्य मांस म्हणजे गायीचेंच ठेवलेलें असतें; तें अगदीं अुघडपणें, वर्गवारीनें. ही तंगडी, हा खांद्याचा तुकडा, हें काळीज, अितकेंच नव्हे तर दुकानाचा शृंगार म्हणून अेक दोन तरी मारलेलीं सबंध गाअीचीं वासरें माना कापलेली किंवा कापलेल्या माना अर्धवट लोंबलेलीं अशीं दुकानावरून टांगलेलीं असतात. ख्रिस्तमसमध्यें तर अशा मारलेल्या गायीच्या वासराच्या धडाचें अेक भीषण प्रदर्शन प्रत्येक हाटा-हाटातून, वाटेवाटेनें लटकत ठेवलेलें असतें. ती 'शोभा' अधिक आकर्षक करण्यासाठीं नि तें मांस अगदीं ताजें दिसून गिऱ्हाअिकाच्या तोंडास पाणीच सुटावें म्हणून शिंगासुद्धा लोंबकळणाऱ्या गायीच्या लहान-मोठ्या डोक्यांच्या वर रक्त शिंपडतात, गायींच्या जिभा त्याना मारतांना जशा तोंडातून खाली लंबतात तशाच्या तशा जिभा लोंबत असलेली रक्ताळ मुंडकीं परोपरीनें टांगून त्याभोंवतीं कागदाच्या फुलांची निरनिराळी आरास केलेली असते. तीच गोष्ट बकऱ्यांच्या मांसाची, धडांची, मुंडक्याची. हें दृश्य आपल्यास जितकें राक्षसी वाटतें तितकेंच तें युरोपियनांना अगदीं सहाजिक नि सभ्यपणाचें वाटतें. त्या दुकानासमोर लहान मुलामुलीना घेअून आअीबाप, नौकरचाकर, तरुण-तरुणी, सभ्य गृहिणी, भटाभिक्षुकांच्या ( Priests ) च्या देवदासी बाया—सर्व वर्गांच्या गिऱ्हाअिकांची दाटी झालेली असून मला 'मासाचा खांदा दे,' 'आअी, गाअीच्या चार जिभा आणखी घे', 'ह्या वासराचें मास नको. तें पाहूं दुसरें धड', असे सारखे आवाज येत असतात. थोडक्यांत म्हणजे, आपण जितक्या निःसंकोचपणें किराणा वा भाजीच्या दुकानात दाटी करून दूधभोपळे, वांगीं, फणस, कलिंगडें, सबंधचीं सबंध वा फांकी कापकापून रसगळत्या ताज्या स्थितींत हाटातून ( बाजारांतन ) घरीं आणतों. तितक्याच निःसंकोचपणें गोमांसाचे ताजे

रक्ताळ भाग तिकडील हाटाहाटांतून शेंकडों स्त्रीपुरुष सकाळसंध्याकाळ विकत घेतांना आढळतात. पुढें जेवतांना आपल्याकडे जसा भात हें एक मुख्यान्न, तसें सकाळ-संध्याकाळ अमेरिकेंतील खाणावळींतून, कुटुंबांतून, घरोघर शिजविलेलें गोमांस हें एक मुख्यान्न वाढलें जातें. त्यांच्या प्रार्थना, टेबलावर गोमांसाच्या शिजविलेल्या तंगड्या-खादे जिभाच्या ढिगांस रचून म्हटल्या जातात नि देवाला तो गोमांसाचा नैवेद्य समर्पिण्यात येतो. पंगतींतून आग्रहानें गोमांस वाढण्यांत येतें. आओबाप, मुलेंमुली निःसंकोचपणें आपण भात खातों तसें प्रत्यहीं तेंच एक मुख्यान्न म्हणून सारे युरोपियन, अमेरिकन लोक गोमास खातात. आपल्या अिकडे गोमांस खाणारे हिंदु जसे केवळ अपवाद; तसेंच गोमांस न खाणारे युरोपियन, अमेरिकन केवळ अपवाद; हजारीं दहा देखील आढळणार नाहींत!

## वरदान कोणत्या अर्थी?

अशा या युरोपियन-अमेरिकन लोकांमध्यें गायीची भक्ति, आमच्या गोभक्तीचे अर्थी वाढत आहे, ते अमेरिकनही गोभक्त होत आहेत, ते अमेरिकनही 'Cow is the mother of prosperity' म्हणून म्हणतात बघा!— असें जेव्हां आमची भाबडी गोसेवक मंडळी सांगतात आणि अमेरिकेच्या लेखकाचीं तशीं वाक्यें वाचून, आमच्यासारखे तेही गयाळ, गोदेव, गोपूजक झालेले आहेत असें समजतात, तेव्हां त्यांची किती हास्यास्पद दिशाभूल होत असली पाहिजे बरे?

अमेरिकन लेखकांतील दोनचार लेखकांचे अुतारे ही गोरक्षक मंडळी येतां-जातां छापतात कीं, तो फलाणा लेखक म्हणतो, "Cow is the foster mother of human race."

पण कोणच्या अर्थी? 'आमच्या राष्ट्राची गाय ही अन्नदात्री आहे', असें अमेरिकन जेव्हां म्हणतो, तेव्हां ती भरपूर दूध देते म्हणूनच काय तें नव्हे! तर त्या स्तुतीचें कारण स्वतः अमेरिकन लोक काय सांगतात तें अैका:

"Truly the cow is one of the greatest blessings of the human race, because her flesh and that of her progeny feeds the nation with its most stable meat!"

(H. D.)

**"गाय ही मनुष्य जातीला लाभलेलें अेक महान् वरदान होय! कारण कीं गायीचें नी तिच्या वासरांचें मांस हेंच आमच्या राष्ट्राचें मुख्य मांसान्न होय!!!"**

आतां आलें का ध्यानांत कीं, मासखाऊ अमेरिकन राष्ट्रांत कोणच्या अर्थी गायीचें माहात्म्य मानलें जातें तें? ती दूध देते तोंवर तिच्या दुधावर, आटते तेव्हा तिच्या गोमांसावर, यथेच्छ ताव मारतां येतो, म्हणून अमेरिका गायीचा प्रतिपाल करते, गोधनाची जोपासना करते! पण अमेरिकेसारखे गोमांसखाअू लोक गायीस राष्ट्राची अन्नपूर्णा कां म्हणतात, तीं कारणें सांगणारीं वरीलसारखीं वाक्यें अमेरिकेच्या मासिकांतून हजारो प्रसंगीं छापली जात असतां, ही आमची भाबडी गोसेवाक मंडळी वाचली न वाचली करतात, तीं वाक्यें आमच्या गयाळ वाङ्मयातून छापीत नाहींत, आणि लोकांत असा गैरसमज फैलावूं पहातात कीं, "अहो, ते अमेरिकनांसारखे प्रगत लोकही गायीस अन्नपूर्णा, राष्ट्रमाता म्हणून गौरवितात; अगदीं आमच्यासारखे ते गोभक्त आहेत; गायीला आमच्यासारखे ते पूजतात, तिला देवी मानतात!!"

अमेरिकेची गोभक्ति म्हणजे रक्ताळ गोमांस पोट भरून खाल्ल्यानंतर आलेली ढेंकर होय! तिच्या दाखल्यानें आम्हां गोमांसनिवृत्त हिंदूंच्या गोभक्तीस समर्थू पहाणें म्हणजे वैद्याच्या शल्यांस कसायाच्या सुऱ्याची अुपमा देणें होय!

अमेरिकेनें अमुक केलें म्हणजे तें बरोबर असलेंच पाहिजे असें समजणें हीच मुळीं चुकी. अमेरिका गोमांस खाते, म्हणूनच काय तें आम्हींही खावें किंवा खाअूं नये, असा त्या दोन गोष्टींचा निर्णायक संबंध मुळींच नाहीं; परंतु आमची गयाळ गोभक्ति नी अमेरिकेची गो-खाअू गोभक्ति यांत आकाशपाताळाचें अंतर आहे, विरोध आहे, हें सत्य आमच्या भाबड्या गोसेवक बंधूंच्या ध्यानीं आणण्यासाठींच वरील वस्तुस्थिति जशी आहे तशी सांगावी लागली.

## नटी पंचगव्य पितात?

आमच्या गयाळ गोपूजनांत नि अमेरिकेच्या गोखाअू गोरक्षणांत केवढा भेद आहे तें खालील कांहीं प्रश्नावरून भाबडेपणाच्याही ध्यानांत आल्यावांचून रहाणार नाहीं.

(१) अमेरिकेंत, गाय 'परलोकीं' गोलोक नांवाचा अुत्युच्च स्वर्ग देणारी देवता आहे असें सांगणारीं पुराणें, धर्मग्रंथ म्हणून सन्मानिलीं जातात का?

(२) अमेरिकन नट्यांपैकीं कांहींनीं गोदुग्धाची स्तुति केली. ठीक! त्यांना तें मानवतें. गोदुग्ध वाअीट नाहीं, कांहींना मानवतें, अितकेंच त्यायोगें सिद्ध होतें. परंतु आमच्या स्त्रियांप्रमाणें त्या नटी गोमूत्रही नित्य नेमानें पितात काय? आणि गोमूत्र पिणें हें 'पुण्यकर्म', म्हणजे जो 'धार्मिक विधि' परलोकीं श्रेयकर तो, अशा भावनेनें गायीचें पंचगव्य 'मंत्रपूर्वक' पितात काय? किंवा गायीच्या खुरांचीं वा शेपटाचीं रांगोळीनें १०८ चित्रें काढून प्रत्यहीं सोवळ्यानें त्यांची पूजा, धूपदीपनैवद्यादि त्या नटी करतात काय? आणि अशीं 'गोपद्माचीं' व्रतें चातुर्मास्य केल्यानें मुलें होतात वा अशी कोणच्याही नवसास ती गायदेवता पावते वा त्या व्रतानें 'देव' परलोकीं सद्गति देतो अशी भावना धरून 'गोपूजा' करतात काय? गोग्रास व्रतें धरून नअू दहा गुळाचे कानवले करून गायीस चारावे नी अेक काय तो गायीचा 'प्रसाद' म्हणून स्वतः खावा, अशीं व्रतें 'धर्मविधि' म्हणून अमेरिकेंतल्या शेंकडों स्त्रिया आचरतात काय?

(३) स्वतःच्या धर्माचे, माणसासारखे मनुष्य, त्यांना 'अस्पृश्य' समजून तशा 'जातीं'तल्या माणसाची सावली पडतांच वा स्पर्श होतांच आपण 'विटाळ'-लों असें अमेरिकन लोक समजतात काय? आणि माणसाच्या स्पर्शाचा वा सावलीचा तसा 'विटाळ' गायीसारख्या पशूला शिवून वा तिची शेपटी डोळ्यांवरून फिरवून जातो नि मनुष्य 'शुद्ध' होतो, असें शेंकडों अमेरिकन गोभक्त स्त्रीपुरुष मानतात काय?

(४) कोण्या गायीला गोठ्यांत न बांधतां, ती खूप दूध देते किंवा व्याल्यावांचून दूध देते म्हणून तिचें अेक देअूळ अुभारून त्या देवळांत देवी म्हणून बांधतात कीं काय? आणि तिचें दूध 'पवित्र' म्हणून आगींतच ओतावें; माणसासारख्या हीन प्राण्यानें न पितां देवांनींच प्यावें; त्या गायीची 'धर्मविधि' समजून 'पूजा' व्हावी; अशा 'धर्माज्ञा' अमेरिकेंतील धर्मगुरूंनीं सोडलेल्या आहेत काय?—कीं जशी गेल्या वर्षींच वैष्णव गुरूंनीं सोडली आणि त्या गोमंदिराचें अुद्घाटन गोसेवक मंडळींनीं मोठ्या धूमधडक्यानें मुंबअीकडे केलें?

(५) रत्नागिरीचे पतितपावन मंदिराचे उद्घाटनीय समारंभीं साधुशील चौंडेमहाराजांनीं पशुयोनींत जन्मलेल्या गायीची पूजा भक्तिभावें 'देवता' म्हणून

करविली; पण 'स्नान करूनसुद्धां कोणताही अस्पृश्य देवाचे गाभाऱ्यांत जाऊन देवपूजा करण्याअितका पवित्र होणेंच शक्य नाहीं, तो जातीचाच अस्पृश्य', असें ठासून सांगितलें, केसरींत पत्र लिहिलें! तशा प्रकारचा पशुयोनीस मनुष्ययोनीहून श्रेष्ठ मानणारा शास्त्रोक्त गयाळपणा अमेरिकेतील किती महाराजात आढळतो?

(६) अमेरिकेवर परशत्रू गायींचे कळपांच्या गोलांना ढालीसारखे पुढें करून त्याचे आड चालत येत असता, हत्यार चालवावें तर गायी मरतात, गोवध हें जन्मोजन्म नरकांत ढकलणारें 'पाप'!—अशा भयानें हत्यारें टाकून देअून, राष्ट्रशत्रूस राष्ट्रांत बिनधोक शिरूं दिलें, राष्ट्रवध करूं दिला, पण गोवध केला नाहीं, अशा लढाया अमेरिका कधीं लढली आहे काय? आम्हीं तें शौर्य गाजविलेलें आहे!

## गाय माता कोणाची?

(७) आपल्या राष्ट्रास उपयुक्त म्हणूनच आपल्या गायी अवध्य. पण शत्रूच्या सैन्यास मांसाचा नि दुधाचा पुरवठा करणारें शत्रूचें गोधनही आपलें शत्रूच. त्या शत्रूच्या दाणावैरणीप्रमाणेंच त्या गायीही मारल्या पाहिजेत असें न मानतां, शत्रूच्या किल्ल्यांतील गायी मरतील म्हणूनच शत्रूच्या किल्ल्यावर भडिमार करण्यास अमेरिकन सैन्यानें कितीदां नाकारलें? किंवा अमेरिकन सैन्य वेढ्यांत भुकें मरूं लागलें असतांही अडगळ झालेल्या निकामी गायीला मारून त्या मांसास खाऊन लढा झुंजविण्याचे प्रसंगीं गोमांस खाण्याचें अमेरिकन सैन्यानें कितीदां नाकारलें? स्वतः तें सैन्य, तीं माणसें, उपाशी मारविलीं, पण गायी मरूं दिल्या नाहींत, असे प्रसंग अमेरिकेच्या अितिहासांत किती आहेत?

(८) अमेरिकनांनीं आपल्या राष्ट्रीयत्वाची अशी व्याख्या कधीं केली आहे काय कीं: 'धेनुर्यस्य महामाता सोऽह्यमेरिकनः स्मृतः'—जशी आमच्या गयाळ मंडळींनीं हिंदुत्वाची व्याख्या केली: धेनुर्यस्य महामाता स वै हिंदुरिति स्मृतः'

वरील कांहीं प्रश्नावरून तरी आमच्या गयाळ गोभक्तींत आणि अमेरिकेच्या गवाहारी गोभक्तींत केवढा फरक आहे तें स्पष्ट होईल का? मेल्यानंतर आत्मा जेव्हां परलोकीं जातो तेव्हां वैतरणी नदी तरतांना गायीच्या शेपटास धरावें लागतें

आणि त्या आधाराआधरानें ती गाय आत्म्यास परलोकीं वैतरणी नदींतून तारून स्वर्गी सुखरूप पोहोंचविते, असें अमेरिका मानीत नाहीं—आम्ही मानतों !

आमच्या गायीवरील लेखाना उत्तर देण्यासाठीं म्हणून जें भारेंचे भारे लिखाण गयाळ मंडळींनीं गेल्या वर्षी लिहिलें आहे, त्यांत बहुतेक भाग 'पहा, ती अमेरिकाही गाअीस माता म्हणते, तिचे दुधाची स्तुति करते, आमच्यासारखीच अमेरिकाही गोभक्त आहे—म्हणून आमची गोभक्ति निर्दोष !' ह्याच घाअूक विधेयाच्या पुनरुक्तीनें भरलेलें आहे. यासाठीं अमेरिकेची गोभक्ति म्हणजे काय हें आम्ही या लेखांत अेकदाचें अुलगडून सांगितलें आहे.

आणि जरी गायीला अगदीं आमच्या गयाळ धेनुदासी संप्रदायाप्रमाणेंच अक्षरशः देवता—मनुष्याहून श्रेष्ठ, परलोकीं गोलोक स्वर्ग देणारी देवता—म्हणूनही कोण्या अमेरिकनानें मानण्यास आरंभिलें, तरीही तशी गोभक्ति बरोबर ठरणार नाहीं, भाबडीच ठरणार. कारण अमेरिकनांत जें जें मानलें जातें तें तें तेवढ्याचसाठीं बरोबर ठरलेंच पाहिजे, असें 'साहेबोक्तम्' चें प्रमाण आम्ही स्वतःसिद्ध मानीत नाहीं. अमेरिकेंतही भ्रमिष्टालयें (lunatic asylums) हीं थोडीं फार असतातच !

तेव्हां आतां यापुढें कोण्याही गयाळजीनें अमेरिकेच्या लोकाचे गायीच्या दुधाविषयीं, विणीविषयीं वा जोपासनेविषयीं भाराभर अुतारे देण्यांत आमच्या टीकेचें अुत्तर सापडेल अशी आशा बाळगूं नये. अमेरिकेचें गोरक्षणविषयक सारें धोरण 'गाय हा अेक अुपयुक्त पशु होय' ह्या आमच्या मुख्य विधानाचेंच समर्थक आहे. तिचें दूध, तिची वीण आणि शेवटीं गोमांस हीं राष्ट्रास अुपयुक्त आहेत हेंच अमेरिकेचें म्हणणें—आणि तेंच आमचें ! परंतु गोमांसाहारी अमेरिका गायीला पारलौकिकदृष्ट्या 'देवता' मानीत नाहीं. गोवध 'पाप' समजत नाहीं. गोपूजा धार्मिक विधि समजत नाहीं. आम्हीही तसें समजूं नये हेंच प्रतिपादितों.

## अहो ! पण शिवाजीमहाराजही स्वतःला 'गोब्राह्मणप्रतिपालक' म्हणवीत !

हें आणखी अेक ठराविक पालुपद आम्हाला अुत्तर म्हणून लिहिलेल्या लेखांत पुनः पुनः घोळलें जातें, आणि त्याविषयीं कांहीं प्रत्युत्तरिण्याची संधि आम्हांस गेल्या लेखांतून सांपडली नाहीं. यासाठीं आमच्या गयाळ मित्रांना या पालुपदा-

विषयीं अितकेंच सांगणें कीं, महाराज जें ब्रीद मिरवीत, तें 'गोब्राह्मणप्रतिपालका'चेंच होतें; गोदास वा धेनुदासपणाचें नव्हतें. गाय हें आपल्या कृषिप्रधान राष्ट्राचें महत्त्वाचें धन आहे. गाय हा अेक अुपयुक्त पशु या दृष्टीनें गोरक्षण, गोप्रतिपालन हें आमचें अेक राष्ट्रीय कर्तव्य आहेच आहे. पण शत्रुपक्षाकडील गायी मारणें हें 'पाप' समजून, गाय ही वस्तूच अवध्य यासाठीं तशा शत्रूच्या गायी मरूं नयेत म्हणून हत्यार टाकून राष्ट्राचा घात करण्याअितकी महाराजाची गोभक्ति बोकाळती तर तीही राष्ट्रद्रोहीच ठरती ! पण त्या महापुरुषानें पितृभक्ति देखील राष्ट्रभक्तीच्याखालीच गणली, तिथें गोभक्तीची कथा काय ? आणि तीच गोष्ट 'ब्राह्मण' प्रतिपालनाविषयीं. काहीं ब्राह्मण अधिकाऱ्यानीं कोष-रक्षणीं वा करसंग्रहीं ढिलाअी केली कीं लगेच महाराजाची दटावणी जाअी कीं, 'ब्राह्मण झालेत म्हणून क्षमा होअील कीं काय ! राज्यकार्यी अळंटाळं होताच ब्राह्मण असलात तरी कडक शासन होअील ! वेळींच शुद्धीवर यावें !' अशा आशयाचीं पत्रे अुपलब्ध आहेत !

पण याही पुढें जाअून असें स्पष्ट सांगणें भाग आहे कीं, महाराजांच्या काय किंवा कोणाही थोर पूर्वजांच्या काय, ज्या भावना वा शास्त्रे वा साधनें असतील तीं त्याच्या काळापुरतीं त्यांना लागूं होतीं. त्याना योग्य वाटली, म्हणूनच काय तीं आजच्या काळालाही योग्य वाटलींच पाहिजेत, असें म्हणणें म्हणजे पूर्वजांच्या मरणानंतर पृथ्वीनें फिरायचें नी काळाच्या घड्याळांनीं चालायचें सोडून दिलें, असें म्हणण्यासारखें मूर्खपणाचें आहे. महाराजाच्या परिस्थितींत ज्या ब्रीदांचा नी शास्त्रांचा नी शस्त्रांचा अुपयोग, तीं त्यांनीं वापरलीं; राष्ट्र राखलें; बस्स. त्यांचें कर्तव्य त्यांनीं केलें. आमचें कर्तव्य आमच्या परिस्थितींत राष्ट्र राखावयास अवश्य तें जुनें नि नवें साधन हातीं घेणे हेंच होय. ग्रहणें, सूर्यचंद्रांना राहू-केतु खातात म्हणून घडतात, असें शिवाजी मानीत, म्हणून प्रत्यक्ष ज्ञानाला नाकारून आजही शाळांतून ग्रहणाचीं तीं कारणें शिकवायचीं कीं काय ? महाराज बैलगाडींत बसत म्हणून आज आगगाडींत बसायचें नाहीं कीं काय ? महाराज कंबरेस भवानी लटकावीत, डोक्यास पोलादी शिरस्त्राण, हातीं वाघनखे—मग तुम्ही डोक्यास कानटोप्या नि हातीं जपमाळा कां धरल्यात ? देश-काल-पात्राच्या तारतम्यानेंच ना ? हें गयाळ मंडळीस कळत नाहीं ! महाराजांच्या गोब्राह्मणप्रतिपालनाच्या ब्रीदाप्रमाणेंच आणखी म्लेंच्छहननासारख्या असणाऱ्या कांहीं ब्रीदाविषयीं या मंडळींत

गोष्ट काढून बघा. तें नांव घेतांच पहा कसे थरकापतात! "अरे बापरे!" म्हणूनच कानावर हात ठेवतात नि म्हणतात, "अहो! कांहीं काळवेळ तर बघाल! शिवाजीची परिस्थिति कुठें, आज कुठे! आपलें कर्तव्य म्हणजे 'श्रीराम जयराम जयजयराम!!!' अेक कोटी वेळ हा मन्त्रजप, अेक कोटी वेळ पंचगव्य—आणि पांजरपोळ!!"

## तीच गोष्ट परमपूज्य पंडित मालवीयजींच्या 'मानबिंदु' विषयीं!!

पुण्यास पंडितजी म्हणाले, "गायीचें दूध अत्यंत हितकर! म्हणून ती मातेपेक्षाही थोर! हिंदु सस्कृतीचा गाय हा मानबिंदु आहे!!!" असें पंडित मालवीय म्हणाले बरें का! म्हणून आम्हाला ताज्या 'गो-रक्षणा' च्या अंकांत त्याचे संपादक बजावतात. देवाच्या नैवेद्याचें दूध वंदून प्यावें, तसेंच पंडित मालवीयांसारख्या ऋषितुल्य वृद्धांचा शब्द सादर अैकावा. पण तें नैवेद्याचें दूध जिभेला लावतांच जर नासलेलें लागलें तर जसें वंदूनच पण टाकून द्यावें हाच धर्म, तसेंच अशा पुरातन पुरुषांचे शब्दही अद्यावत् सत्याच्या कसोटीला लावताच जर अतथ्य ठरले तर सादरच पण निषेधावे हेंच कर्तव्य. गाय राष्ट्रास दूध देते म्हणूनच माता, मातेहून थोर, तर दुधाअितकेच महत्त्वाचें अन्न जें तांदूळ नि गहूं त्या तांदुळांचें पोतें पित्याहून मोठें कां ठरू नये? दूध देते; बस्स, येवढेंच गाईचें महत्त्व. बाकी सर्व गोस्तोम शुद्ध बावळटपणा. गाय हा हिंदु राष्ट्राचा अेक दुग्धबिंदु! मानबिंदु नव्हेच नव्हे! भक्ताचा देव, त्याचा भक्तिबिंदु, भक्ताहून महत्तर हवा, तसाच राष्ट्राचा मानबिंदु, ज्यायोगें राष्ट्राचा अत्युत्तम पराक्रम, तेज, आकांक्षा, दुर्घट करून सोडील, माणसांचे अतिमानुष करून सोडील असा महत्तम हवा! वाटेल त्यानें पिळावी, वाटेल त्यानें खावी, अशी ही गाय आमच्या आजच्या दुर्बळतेचा मानबिंदु आहेच आहे, अगदीं यथोचित प्रतीक आहे! पण ह्या हिंदु राष्ट्राचा उद्यांचा तरी तसला भुक्कड मानबिंदु राहतां कामा नये.

लेखनमर्यादा संपली तरीही नागपूरच्या 'महाराष्ट्र' पत्रांत गोसेवक श्री. सरंजामे यांचा अत्यद्भुत शोध जो अलिकडेच प्रसिद्ध झाला आहे तो वाचकांना नुसता कळवून तरी ठेवलाच पाहिजे. वाचकहो, लोकमान्यांसारखा कुलदीपक सुपुत्र ज्यायोगे हटकून होतो अशी दिव्यौषधि श्री. सरंजामे यानीं शोधून काढली आहे, याचा तुम्हास अजून पत्ताच नाहीं का? अहो, काय सांगावें, आनुवंशशास्त्रांत, सुजननविद्येंत, Eugenics मध्यें असा अद्भुत शोध जर युरोपमध्यें लागता, तर जगभर त्याचा

डिंडिम गाजता. आम्हां भारतीयाच्या गुणांचें आजकाल चीज होत नाहीं हेंच खरें ! लोकमान्य टिळकाच्या केळकरांसारख्या चरित्रकारकालाही जें रहस्य अुलगडलें नाहीं, तें 'जगज्जननी' 'आदिदेवता' जी गोमाता तिनें सरंजामे याना गेल्या दोन महिन्यापूर्वी सांगून टाकलें ! तें वृत्त त्यांच्याच शब्दांत सांगणें अुचित :

" त्रिकालज्ञान अशा आमच्या स्मृतिकारांनीं गोमूत्र आणि गोमय यांचें जें महत्त्व सांगितलें तें विज्ञानशास्त्रानेंही खरें कसें ठरते तें कोणी सांगू लागला तर सावरकर तें अक्षम्य ठरवितात ! पोथींतल्या गोष्टी सावरकरांना मान्य नाहींत ! पण आजच्या या युगातही. . .लोकमान्यांसारखा सुपुत्र होण्यासाठींसुद्धां गोसेवेचें कारण मुळाशीं आहे हें त्याच्या चरित्रभागांत नमूद आहे. लोकमान्यांसारख्या अलौकिक पुरुषाला जन्म देणाऱ्या त्या थोर मातेनें नित्यनियम म्हणून पंचगव्य प्राशन केलें तें गोमाता व देवता ह्याच भावनेनें केलें असलें पाहिजे हें उघड आहे. धार्मिक लोक गायीस माता व देवता अलंकारिक भाषेनें म्हणत नाहींत. ते अक्षरशः तिला तसें मानतात; व तसें मानण्यांत कोणतीच अडचण नाहीं, लाज तर मुळींच नाहीं !"

—महाराष्ट्र ( ३–१२–३५ )

कां ? आमच्या 'त्रिकालज्ञानी' स्मृतिकारांचें गोमूत्र-गोमयाचें माहात्म्य 'विज्ञान शास्त्रा'च्या या अत्यद्भुत शोधानें निर्विवादपणें सरंजामे यानीं सिद्ध करून दाखविलें कीं नाहीं ? या अुताऱ्यातील प्रत्येक शब्द गयाळ वेदातील सूक्तासारखा मंत्रमय आहे खराच ! विज्ञानाचा पुरावा द्यावा तर असा ! लोकमान्याची माता पंचगव्य पीत असे. आणि त्या साध्वीच्या पोटीं लोकमान्यांसारखा सुपुत्र निपजला. अर्थात् पंचगव्य हेंच त्या अलौकिक पुत्रप्राप्तीचें दिव्यौषध !!

कार्यकारणभाव जाणण्याची बुद्धीची क्षमता धर्मभोळेपणानें कशी पंगु होते याचें ह्या वरील गयाळ कोटिक्रमाहून दुसरें अुदाहरण काय द्यावें ? लोकमान्याची माता, पंचगव्याप्रमाणें मीठ, मोहरी, मसाला, भात, वरण, पाणी, भाज्या प्रभृति किती तरी पदार्थ ल्हानपणापासून सेवन करीत नव्हत्याच, असें कांहीं अेक गमक अजून सांपडलें नाहीं. मग त्या पदार्थापैकीं पंचगव्यसेवनानेंच असा अलौकिक पुत्र झाला हें कसें सिद्ध झालें ? सरंजाम्यासारख्या गोमयानदांना तें पंचगव्यप्राशनाचें फळ वाटतें. लवणानदांसारख्या मीठ खाण्याच्या अभिमान्यांना मीठ खाल्लें म्हणून

लोकमान्यासारखा पुत्र झाला असें त्याच न्यायानें कां वाटूं नये? वॉशिंग्टन, नेपोलियन, लेनिन, डार्विन, याच्या मातापैकीं कित्येक प्रायशः गोमांस सेवीत नि कित्येक प्रसंगीं मद्यही पीत! मग गोमांस खाल्ल्यानें अलौकिक पुत्र जन्मतात, असेही 'त्रिकालज्ञानी' नियम कां बांधतां येऊं नयेत? पण गायीसारख्या एका पशूस अक्षरशः देवता मानण्याइतकी ज्याची भावना 'धार्मिक' त्याची बुद्धीही पंचगव्य पिण्यानें अलौकिक पुत्र होतो असें विश्वसण्याइतकी पंगु झाली नसती तरच नवल!!

# अकरावा किरण

## ही भूतदया कीं भूतबाधा ?

### जी मानवी हितास पोषक तीच खरी भूतदया

मनुष्यसमाजाचें स्थैर्य नी प्रगति, सुखसमाधान नी शोभा, ज्या कांहीं अत्युदार भावनांवर अवलंबतात त्याच्यांत दया मुख्य होय. मुलाला जशी आओी तशीच समाजाला दया. तिच्या दुधावर तो जगतो ! तिच्याच ममतेच्या मांडीवर वाढतो.

अहिंसा हीही तिच्या धात्वर्थी दयेचाच एक पोटभेद आहे. व्यापक अर्थी, कोणासही शब्दानेंदेखील न दुखविणें ह्या अर्थी, अहिंसा हीच निष्क्रिय दया. पण तरीदेखील दया हीच श्रेष्ठ. कारण अहिंसा फार तर चांगल्या दायीसारखी ब्लेंच कोणास दुखविणार नाहीं. पण दया ही आओीसारखी दुःख पहाताच द्रवेल, दुखणाअिताची शुश्रूषा त्यापायीं स्वतः दुखणाअीत झाली तरी ममतेनें करीतच राहील. यासाठींच संतसज्जनांनीं म्हटलें आहे, 'दया धर्मका मूल है !!'

### मनुष्यदया नी भूतदया

मनुष्यानें मनुष्यावर दया करावी हा माणसकीचाच धर्म आहे. दया ही मनुष्याची अेक अत्युदार अशी नैसर्गिक प्रवृत्ति आहे; अत्युदार अशासाठीं कीं, देशकालपात्रविवेकानें त्या भावनेचा सदुपयोग मनुष्य करीत गेला तर मानवी

---

किर्लोस्कर मासिक, डिसेंबर १९३६

समाजाचें त्यात कल्याणच आहे. परतु मनुष्याची दयाशीलता ही मनुष्यापुरतीच मर्यादित नसते. दुःखी मनुष्य तळमळताना पाहून, लेकरूं पाळण्यातून पडताना पाहून, मनुष्य जसा दयेनें द्रवतो, त्याची समवेदना जागून त्या दुःखिताचें दुःख त्याला निवारावेंसें वाटतें, तसेंच त्याच समवेदनेच्या जाणिवेसरशीं मनुष्येतर प्राण्यांतील अेखादी पाळीव गाय खड्डयात पडून दुखावली तर तिचीसुद्धां मनुष्याला सहजींच कींव आल्यावाचून बहुधा राहात नाहीं. पक्ष्याच्या घरट्यांतून अपघातानें धप्पदिशीं खाली पडलेलें साळुकीचें वा पोपटाचें चिमुकलें पिलूं चिंवचिंव करूं लागताच त्याला चटकन् अुचलून पाणी पाजून सुरक्षित अुबेंत ठेवल्याचाचून मनुष्याला चैन पडत नाही.

मनुष्यदयेची व्याप्ति याच प्रक्रियेनें वाढत जाअून प्रथम मनुष्याला अुपयुक्त त्या त्या प्राण्याविषयीं वाटणाऱ्या दयेंत–प्राणिदयेत–परिणत होते. हिंदूंना गायीविषयीं ममत्व वाटूं लागलें. अरबांना उंटाविषयीं विशेष ममता वाटू लागली. ज्यू लोकांच्या धर्मग्रंथांतून त्याचे प्राचीनतम पूर्वज शेळ्यामेंढ्याना कसे जीव की प्राण करीत तें पानोपानीं ग्रंथिलेलें आहेच. जे मांसाहारी असत ते देखील ह्या अुपयुक्त प्राण्यांना मारतांना मनातल्या मनात त्या क्रूरतेला लाजत. आपल्याला जसा प्राण प्रिय, दुखापतीनें आपण जसें विव्हळतों, तसेंच ह्या प्राण्यांनाही त्याचा प्राण प्रिय असल्यानें ते मरणास भितात, दुखापतीनें दीन होअून गयावया करतात, विव्हळतात, ही समवेदना मांसाहारी लोकाच्या मनाला बोचल्यावांचून रहात नाहीं. भयानें, लोभानें, क्रोधानें कितीही दाबून टाकली गेली तरी, प्राणिदयेची ही भावना मांसाहारी मनुष्यांतही ह्या वा त्या प्रमाणात असतेच असते. म्हणूनच मृगया करणाऱ्या मृगयूला देखील गोळी लागून पडलेल्या नी मरणाचे आंचके देणाऱ्या वाघालासुद्धां पाहून त्याची काहींतरी कींव येते. तें काळ्याभोर, चंचल नी प्रेमळ नयनांचें मनोहर हरीण त्याच्यामागें लागलेल्या पारध्याच्या तीक्ष्ण बाणांनीं विंधिलें जाताच जेव्हां धाडकन् खालीं पडतें, आणि त्याच्या त्या कमळासारख्या डोळ्यांतून पडणारीं टिपें जीवनाची याचना करीत गळूं लागतात, तेव्हां त्या प्रत्येक पारध्याचेंही मन त्याला आतल्या आत टोंचल्यावांचून सहसा रहात नाहीं कीं–‘ न खलु न खलु बाणस्सन्निपात्योऽयमस्मिन् । मृदुनि मृगशरीरे तूलराशाविवाग्निः ॥ क्व बत हरिणकानां जीवितं चातिलोलम् । क्व च निशितनिपाता वज्रसारा शरास्ते ॥ ! ! ’

बुद्ध भगवान् बुद्धत्वप्राप्तीपूर्वी तारुण्यात राजपुत्र गौतम याच भूमिकेवर जेव्हां होते, तेव्हा तेही क्षत्रियोचित मृगयेंत भाग घेत; पण देवदत्ताच्या बाणानें व्याकुळ होअून अेक पक्षी राजपुत्र गौतमाच्या पायापाशीं अेकदा तडफडत पडला असता त्याच्या त्या प्राणांतिक वेदना पाहून गौतमाना अितकी दया आली कीं, त्याच्या स्वतःच्या डोळ्यातूनही टिपें गळूं लागलीं. त्यानीं आपल्या हातानें शुश्रूषा करून त्या पक्ष्याला ह्या दुःखापत्तींतून वाचविलें. जो पराक्रमी पुरुष पुढें गुरु गोविंदसिंगाच्या पश्चात् शिखाचे धुरीणत्व घेअून पंजाबात मुसलमानांना कर्दनकाळासारखा भासला, तो वीर बदा, त्याच्या पूर्वाश्रमीं अेक साधु होता. त्याला ती अुपरति होण्याचें कारणही हेंच झालें. तो मृगयेंत अत्यंत निष्णात असे. धनुर्धरात त्याचा हात धरणारा वीर विरळा. पण मृगया करता करतां अेके दिवशीं त्याच्या शरानें अेक हरिणी मारली गेली. जवळ जाऊन पहातो तों ती गर्भवती ! त्या शरानें विद्ध, विव्हळत, ती रक्त ओकत आहे, आणि त्या असह्य घावासरशीं विकलगात्र मृगीचा गर्भ फाटून दोन सुंदर पाडसें फटकन बाहेर पडून तडफडत आहेत ! ! त्या करुण दृश्यासरशीं त्या मृगयू माधवदासाला दयेचा अितका अनावर अुद्रेक आला कीं, त्यानें पुन्हा धनुष्य म्हणून हातीं धरावयाचें नाहीं, मृगया नी जीवहत्या म्हणून करावयाची नाहीं, असा निर्धार करून वैष्णव साधूची दीक्षा घेतली, आणि मृगयू माधवदास निरामिष साधु झाला.

हीं जशीं व्यक्तींचीं अैतिहासिक अेक दोन अुदाहरणें वानगीसाटीं दाखविली, तशींच ज्या धर्मपथानीं मृगया वा मासाशन वा प्राणिहिंसा आमूलाग्र सोडली नाहीं, त्यानींदेखील मारण्यामारण्याच्या पद्धतींतही त्यातल्या त्यात कमी क्रूर पद्धत स्वीकारावी म्हणून जे निर्बंध घातलेले आढळतात, तेही ह्या चोरट्या दयेचेच पुरावे होत. अुदाहरणापुरतें मुसल्मानाच्या नी आपल्या हिंदूतील शिखाच्या प्राण्याना मारण्याच्या पद्धतींत माजलेला वाद पहा. मुसल्मानात मांसाशनास्तव पशुवध करताना सुरी खसाखस करवतीसारखी चालवितात. त्यायोगें कापल्या जाणाऱ्या पशूला अधिक वेदना ज्या भोगाव्या लागतात तितक्या तरी टाळाव्या या हेतूनें शिखात अेका झटक्यासरशींच पशूला मारलें पाहिजे असा धर्मनियम घालून दिला. त्या नियमावर धार्मिक छाप पडल्यामुळें धर्मछापाच्या रूढींत जी 'पापपुण्या'ची वृत्ति बळावते तशी बळावून, कोणचाही पशु तसा झटक्यासरशीं जर न मारला गेला तर त्याचें मांस खाणें पाप होय, अशी निष्ठा प्रचलील.

पहिल्या मुसलमानी पद्धतीस 'हलाल' म्हणतात; दुसऱ्या एका घावासरशीं मारण्याच्या पद्धतीस 'झटका' म्हणतात. अर्थात् धर्मछाप अतिरेकाच्या नेहमींच्या प्रभावानें मुसलमान 'झटका' मास कधींही, अुपाशी मरू लागला तरी, खाणार नाहीं. 'हलाल' मास खाणें शीख निषिद्ध मानतात. या मतभेदामुळें पजाबात दोन्ही समाजाचे कसाअीखाने स्वतत्र असतात, अितकेंच नव्हे तर ते शेजारीं शेजारीं असले, तर अेकमेकाच्या धर्मभावना दुखतात म्हणून अनेकवार भाडणेंही होतात ! या भांडणातील धर्मवेडाची बाजू सोडली, तर या लेखापुरती जी मुख्य गोष्ट अुल्लेखाई आहे, ती ही कीं, प्राणिवध करतानाही मनुष्याच्या मनात त्या प्राण्याच्या दुखापतीसरशी दयेचा काहीना काहींतरी अुद्रेक होतोच होतो. मनुष्य-दया जशी अुपजत, तशीच मनुष्याच्या मनात त्याच समवेदनेच्या बळें, सहानु-भूतीच्या स्वाभाविक प्रवृत्तीमुळें, प्राणिदयाही अुपजल्यावाचून रहात नाहीं.

ह्या भावनेनें ज्याची दयाशीलतेची कक्षा यच्चयावत् प्राणिमात्रात सामावण्या-अितकी व्यापक झाली, त्यानीं सर्व सद्गुणामध्यें भूतदयेला अत्युच्च स्थान दिलें. मनुष्यदयेची व्याप्ति प्रथम मर्यादित प्राणिदयेंत होअून शेवटीं अत्यत कोवळ्या नी सात्त्विक सत्पुरुषाच्या मनात तिची परिणति व्याघ्रसिंहादिक हिंस्र पशूंवरही दया करणाऱ्या भूतदयेंत झाली.

जर आपणच 'निर्वैरः सर्वभूतेषु' झालो आणि 'दया सर्वेषु भूतेषु' करूं लागलों, तर व्याघ्रसिंहादिक हिंस्र पशूही आपलें वैर सोडून देतील, आपण साधु झालों तर तेही साधु होतील, नाहीं कशावरून ?—अशी असंभव आशाही त्यांनीं धरली ! तसें होणार होतेंच, अशी हमीसुद्धा दिली ! आणि भूतदयेस व्यवहार-विण्याचा कृतसंकल्प करून तो प्रत्यक्ष प्रयोग आपापल्यापुरता तरी अनेक सत्पु-रुषांनीं आजवर करून पाहिला. या वा त्या प्रमाणांत भूतदयेचा महनीय धर्म स्वतः शक्य तों आचरणारे हे सत्पुरुष जगातील बहुतेक प्रगत समाजात मधून मधून निघाले; परंतु भूतदया हें नुमतें तात्त्विक ब्रीदच काय तें न मानता ती आपल्या प्रतिक्षणाच्या व्यवहारात आचरून दाखविण्याच्या कार्यांत हिंदु राष्ट्रानें अभिनदनीय, अत्युदार पण अयशस्वी असा जो महनीय प्रयोग केला तो केवळ अतुलनीय होय ! दुसऱ्याचा प्राण घेऊन आपल्या पोटाची खळगी भरण्याची त्यांना अितकी शिसारी येऊं लागली कीं, लक्षावधि लोकांच्या जातीच्या जाती निवृत्तमांस झाल्या ! शतकें

नव्हे सहस्रकें, आपल्या भोगविलासाचा त्याग करून असहनीय बंधनें स्वतःवर लादून घेऊन भूतदयेच्या ब्रीदास त्यानीं अद्याप सभाळलें आहे ! या प्रश्नाची मतमतांतरें चर्चिताना मनुस्मृतींतच म्हटलें आहे :

'योऽहिंसकानि भूतानि हिनस्त्यात्मसुखेच्छया। स जीवश्च मृतश्चैव न कश्चित्सुखमेधते ॥ १ ॥ ( अहिंसक प्राण्यांना मारू नका ! त्याच्याही पुढें जाऊन सागतात— ) यो बन्धनवधक्लेशान्प्राणिना न चिकीर्षति । स सर्वस्य हितप्रेप्सुः सुखमत्यन्तमश्नुते ॥ नाकृत्वा प्राणिनां हिंसां मासमुत्पद्यते क्वचित् । नच प्राणिवधस्वर्ग्यस्तस्मान्मासं विवर्जयेत् ॥ समुत्पत्ति च मासस्य वधबन्धौ च देहिनाम् । प्रसमीक्ष्य निवर्तेत सर्वमासस्य भक्षणात् ॥ अनुमन्ता विशसिता निहन्त क्रयविक्रयः ॥ संस्कर्ता चोपहर्ता च खादकश्चेति घातकाः ॥ स्वमासं परमासेन यो वर्धयितुमिच्छति । अनभ्यर्च्य पितृन्देवांस्ततोन्या नास्त्यपुण्यकृत्' ( मनु. अ. ५ )

प्राणिमात्रास दुःख नकोसें, जीव प्यारा; जसा आपल्याला ! हें स्मरून प्राणिमात्रास दुखवूं नकोस, त्याच्या जीवाला क्लेश होईल असें करूं नकोस, अुलट त्याचें दुःख निवारण्यास्तव स्वतःचा बळी द्यावा लागला तरी चिंता नाहीं ! या दयाममतेपायीं भयंकर दुष्काळांतही त्यांनीं मास वा मत्स्य खाल्ले नाहीं, पिंजऱ्यात पाळलेले पोपट सोडून दिले, तुकारामाप्रमाणें पाखराना शेतें खाअूं दिली, मृगया वर्ज्य मानली, यज्ञांत बळी द्यावयास चालविलेलें कोंकरूं लंगडतेंसें पाहून ते बुद्धासारखे गहिंवरले, त्या कोकराला स्वतःच्या लेंकरासारखें कडेवर घेअून चालले, यज्ञांत पशुवधाच्या ठायीं घृतपशूचा वा पिष्टपशूचा विकल्प कल्पिला, गायीची सेवा देवाच्या सेवेसारखी पवित्र मानली, मुंग्याच्या वारुळावर जाऊन पीठ नी साखर पेरली, सापालादेखील वर्षातून नागपंचमीचा अेक दिवस कां होईना, पण जातिवैर विसरून विश्वबंधुत्वाचें नातें स्मरून दूध पाजीत आले, आणि कित्येक तर स्वतःला डसणाऱ्या सापालासुद्धा मारूं न देता जिवंत जाअूं देत आले !! ढेकूण, पिसवा ह्यांनासुद्धां न चिरडतां दूर नेअून सोडलें, कीडमुंगी मरेल म्हणून पाहून पाहून जन्मभर पाय टाकले, निकम्मी गायीचेच नव्हेत तर कुत्र्याचेही शेंकडो पांजरपोळ घातले, कुत्र्यांच्या पिलांना पोटभर दूध मिळत नसल्यास धर्मार्थ पांजरपोळांमध्यें लेंकरांना लावावे तसे त्या कुत्र्यांना दुधाचे अुकाडे लावले; त्याच्याही पुढें जाअून सूक्ष्म प्राण्यांचेंही दुःख निवारण्यासाठीं, निदान त्यांची हत्या तरी घडूं नये म्हणून, पाणी-

सुद्धां तापवून पिऊं लागले—कीं त्यायोगे पाण्यांतले जीवजंतु जिवंतपणें खाऊन टाकल्याची राक्षसी क्रूरता हातून घडूं नये! दिवसां अन्नावर घोंघवणारे जीवजंतु दिसतात तसे रात्रीं दिसत नाहींत, चुकून अन्नाबरोबर पोटांत जातील, या भयें रात्रीं असें जेवायचेंच नाहीं, असे कडक आचार सहस्रावधि लोकांनीं जन्मभर पाळले! श्वासासह अनेक सूक्ष्म जंतू आत खेचले जाऊन मरतात असें तर्कून नाकावर फडकीं बांधून ठेवली कीं, त्यायोगे बाहेरचे अनेक जंतूंचे जीव श्वासासरशीं आत खेचले जाऊन गुदमरून मरूं नयेत! तितकी तरी हिंसा टाळावी!!!

मृगया निषिद्ध; अवघा दाक्षिणात्य ब्राह्मण, जैन, वैष्णव प्रभृति जातिपंथानुयायाच्या लक्षावधि लोकांनीं शतकोशतकें मांसमत्स्याचा आहार सर्वस्वीं वर्ज्य केलेला आहे! दुसऱ्याच्या मांसारक्तावर आपलें मांसरक्त वाढविण्याची चटक ही राक्षसी कीं माणुसकी? त्याची आवश्यकता तरी काय? जर 'स्वच्छंदफलजातेन शाकेनापि प्रपूर्यते। अस्य दग्धोदरस्यार्थे कः कुर्यात्पातकं महत्'!! बिचाऱ्या पांखरांचे पंख कांद्राच्या पाचोळ्यासारखे उखड; सुंदर हरिणाचे देह वाग्यांसारखे भाजून भाजून चिरून चिरून त्यात मसाला भर; पायानें दाबून धरून प्राणासाटीं केविलवाणें ओरडणाऱ्या कोंबड्याची मान कचाकच काप; आणि तो भयंकर रक्तबंबाळ खाटिकखाना! ते प्राणान्तिक वेदनाचे हंबरडे!! हर हर! कच्चें नृमांस खाणाऱ्या त्या पिशाच्चापेक्षा ही क्रूरता काय कमी आहे? त्यापेक्षा ही शुद्ध, सरस, हिरवीगार, ताजी-ताजी शाकभाजी; ही सुरंग, सुमधुर फळफळावळ; हीं नानाप्रकारचीं स्वादु, सात्त्विक धान्यें; त्यावर काय पोट भरता येत नाहीं? मग तें मांसाहाराचें पैशाचिक पाप का करा? शाकाहार, धान्याहार, फळाहार—किती हिंसाशून्य, माणुसकीस साजेसा! साधुजीवनास तोच योग्य!

पण अितक्यांत अत्यंत कोमल मनाची दया डोळ्यात टिपे आणून म्हणूं लागली, धान्याहार? शाकाहार? हे पहा, त्या धान्यभाजीपाल्यासाटीं शेतकरी नागर चालवितात तिकडे! नागराच्या फाळासरशी कीडमुंगी, जीवजंतूंची भूभागीं वसलेलीं नगरेंचीं नगरें अुन्मळून कोसळत आहेत. त्याच्या वसाहतीची नादिरशाही कत्तल चालली आहे! लाखों जीव तुमच्या या शेतीपायीं टायींठायीं जिवास मुकताहेत! आणि तुम्ही म्हणतां धान्याहार, शाकाहार हा सात्त्विक, अहिंसक नी साधुशील म्हणून!! तो संहाराचा खाटिकखाना जितका हिंसक, तितकीच ही धान्या-

हाराची वा शाकाहाराची शेती! मोठ्या स्थूल जीवाला जीव जितका प्रिय, तितकाच सूक्ष्म जीवाला जीव प्रिय! तेव्हा खाटिकखाना तेवढा निषेधूनच चालणार नाहीं, तर दयाशील साधुसंतानीं 'हिंसाप्रायाम् पराधीनाम् कृषिं यत्नेन वर्जयेत् ॥' म्हणून मृगया जशी निषिद्ध, मासाशन सर्वस्वीं वर्ज्य, तशीं हिंसा सपूर्णपणें टाळणें तर धान्याहार, शाकाहार, कृषि, हीं पापमयच ठरली!! तरीही दयाशीलतेचा, अहिंसक बुद्ध्याचरणाचा हा मननीय नी सदिच्छ प्रयोग करणारे शतावधि सत्पुरुष कचरले नाहींत. कृषि नसला तरीही आपोआप उगवणारी नानाविध वनस्पतींचीं नी फलवृक्षाचीं काननेंचीं काननें निदान ह्या भारतभूत तरी काय थोडीं आहेत? आम्ही केवळ वनस्पति नी फळें खाऊन राहू, पण भूतदयेच्या ब्रीदाचा बाणा कलंकूं देणार नाहीं! त्या सत्पुरुषांचा हा निश्चय कोणच्याही प्रकारचा गर्विष्ठ अभिनिवेश नव्हता. त्याचें कोमल अंतःकरण जीवमात्राच्या दुःखानें द्रवेच मुळीं तसें!

पण मानवी मनाच्या क्रूरतेला जशी सीमा नाही, तशीच त्याच्या कोमलतेलाही सीमा नाहीं! केवळ स्वच्छदपणें उगवणाऱ्या वनस्पति नी येणारीं फळें खाऊं म्हटलें तरी हात धुऊन पाठीस लागलेली हिंसा विकट हास्य करून उपहसूं लागली कीं, 'वनस्पति नी फळें? पण ज्या सूक्ष्म विचाराची वाट तूं चोखाळीत आलास, त्याच सूक्ष्म विचाराला विचार कीं, वनस्पतीलाही प्राण नाही कीं काय? सुखदुःख, भावना नाहींत कीं काय? प्रत्येक स्त्रीकेसर नी पुंकेसर कामेच्छेनें सयुक्त होण्यास कामीकामिनींप्रमाणेंच लंपटलेला असतो! त्याना लागलेलें फळ हे त्याचें अपत्यच आहे! त्या प्रत्येक फळातील प्रत्येक बीं पुन्हा उगवून येण्यासाटीं, वाढण्यासाटीं, प्रकाशवायुजल यांची रुचि चाखण्यासाटीं, भूमीत रुजून उगविण्यासाटीं उत्सुकलेलें असणारच! प्रत्येक वृक्षलता सजीव, प्रत्येक फळातील प्रत्येक बीं अेकेक गर्भ आहे! असें जे फळ तूं खाणार त्यातील प्रत्येक बीजामागे अेकेका भ्रूणहत्येचें पातक तुला लागणार!

बिचारी भूतदया! पुन्हां द्रवली! वरील सूक्ष्म विवेक वर दिला आहे त्याहून कितीतरी विस्तारानें हें विवेचन त्या सत्पुरुषांनीं, विशेषतः आपल्या जैन धर्मबंधूंच्या आचार्यांनीं, आपल्या प्राचीन ग्रथातून केलेलें आहे. अितकेंच नव्हे, तर शेवटीं त्यांनीं त्यातल्या त्यात कोणचीं फळें खालीं असता ही बीजहिंसा त्यांतल्या

यात न्यून घडते, तीं कोष्टकेंदेखील दिली आहेत ! अुदाहरणार्थ, वांगे अति निषिद्ध, कारण शतावधि बीज हिंसिल्याचें पाप ! आंबा त्याहून न्यून निषिद्ध, कारण त्यात अेकाच कोयीची, अेकाच बीजाची हिंसा घडणार ! !

पण तरीदेखील हिंसा ही टाळतां येणें अशक्य; तें अशक्यच ठरणार ! फार काय, अगदीं अेकबीजी फळाहारदेखील जरी टाळला, आहार असा जरी केलाच नाहीं, नुसता वारा पिअून जरी कोणी महातपस्वी राहिला, तरी देखील भूतदयेचें ध्येय संपूर्णपणें आचरणें त्यास अशक्यच होणार ! कारण नुसता वारा प्यालें, तरी वाऱ्यातून असख्य सूक्ष्मातिसूक्ष्म जीवजंतु पोटात शिरून जठरानलात भस्म होणार !

आणि मनुष्याचें जीवन हेच अशा प्रकारें सर्वथैव हिंसामय आहे असें पाहून भूतदयेसाठीं त्याचाच नाश केला, कांहींच न खातां-पिता, आपणासच अुपाशीं मारलें, तरी देखील हिंसा टळणार नाहीं ! कारण-आत्मघात म्हणजेही प्राणघात ! हिंसा ! पाप ! ! आणि जर मनुष्यमात्रानें हाच धर्म पाळला तर मनुष्यजातची जात हिंसिल्याचेंच महत्तम पातक पदरीं पडणार !

अितर ध्येयासाठीं मनुष्य स्वतःचा बळी देअून तरी अेक वेळ त्या ध्येयाचा विजय संपादूं शकेल; पण अहिंसेच्या, भूतदयेच्या ध्येयाविषयीं सर्वांत कठीण नी सर्वांत दुस्तर अडचण हीच असते कीं, त्या ध्येयाच्या विजयार्थ स्वतःचा बळी देणें म्हणजेच त्या ध्येयाच्या सर्वस्वीं अुलट जाणें, त्या ध्येयाचा सपूर्ण पराजय करणें, त्या अहिंसा ध्येयाचीच हिंसा करणें ठरतें ! हिंसा घडूं नये, आणि जगणें तर हिंसेवाचून जगताच येत नाहीं; म्हणून मनुष्य स्वतः मेला, किंवा मनुष्यजातची जात जरी काहीं न खाता न पिता हुतात्म्याचें मरण मरती झाली, तरी तीही हिंसाच असल्यानें त्यायोगे जे टाळावयाचें तेंच पाप अचूकपणें पदरीं पडते ! जगावें तरी हिंसा ! मरावें तरी हिंसा ! !

**अशक्य ! अशक्य ! ! अशक्य ! !**

असा हा भूतदयेस वा अहिंसेस सर्वतोपरी आचरण्याचा आपल्या हिंदु राष्ट्रानें प्राणपणानें केलेला प्रयोग सर्वस्वीं अव्यवहार्य ठरला. त्या दैवी सद्गुणाचा शक्यतों अवलंब करण्यासाठीं त्यानीं जो त्याग केला, जे क्लेश सोसले, जी तपस्या आचरली, ती माणुसकीस सर्वथैव भूषणभूतच गणली जाअील. त्यांनीं जगात कोणच्याही राष्ट्रानें त्यापायीं सोसले नाहींत असे कष्ट सोसले, अशी चिकाटी दाखविली. त्यांच्या

सद्धेतूचा करावा तितका गौरव थोडाच आहे; आणि त्या महनीय प्रयोगात त्याना आलेलें अपयश हेंही यशस्वीच आहे. कारण दयाशीलतेला मनुष्य कोठपर्यंत आचरूं शकतो, भूतदया सर्वथैव शक्य आहे कीं नाहीं, हा प्रश्न त्यांनीं अेकदाचा निकालांत काढला. कोणच्याही प्रयोगाची असिद्धि हीही अेक सिद्धीच असते. मृगजळाच्या शतवार पाठीस लागून हरिणें फसतात म्हणूनच मृगजळ फसवें आहे हें ज्ञान झालें. आकाश पर्वतावर टेकलें आहेसें वाटतें तें खरेंच तसें आहे कीं काय हें पाहण्यासाठीं पर्वतामागून पर्वत चढून कैलासाच्या शिखरावर चढलें तरी आकाश पुन्हा आपलें अुंचच्या अुंचच आहे असें दिसलें, ते प्रयोग अयशस्वी झाले, म्हणूनच आकाश हातीं येत नाहीं हें ठरविण्याचा प्रयोग यशस्वी झाला. तसेंच निरपवाद भूतदयेच्या वा अहिंसेच्या मृगजलापाठी धावता धांवतां ते मृगजळच ठरलें. जगावें तरी हिंसा ! चालावें तर पायींपायीं शतावधि जीव मरतात ! बसावें तरी बसल्या-खालीं शतावधि सूक्ष्म जंतू चिरडून जातात ! श्वासोच्छ्वास करावा तरी जीवजंतु मरतात ! नाकास फडकें बाधलें तरी त्यातूनही आंत जाणारे अति सूक्ष्म जंतु मरतात, आणि देहातून बाहेर पडूं पाहाणारे जतु श्वास रोधिल्यानें आंतल्या आंत तडफडून मरतात ! मुळीं नाकतोड शिवूनच टाकलें, तर मनुष्य मरतो ! पाणी थंड प्यायलें तर जीवजंतु पोटात जाअून मरतात, अुकळून प्यायलें तर जिवंत अुकळले जाअून मरतात ! हात हालविला तर शतावधि जीवजंतूंचे मुडदे पडणार ! नुसती डोळ्याची पापणी हालविली तरी 'पक्ष्मणोऽपि निपातेन येषाम् स्यात्स्कधपर्ययः' असे अति सूक्ष्म जीव मारले जातात, घायाळ होतात ! सूक्ष्म जीवजंतूंची गोष्ट सोडली, तरी मांस खावें तर स्थूल जीवाची हत्या ! धान्य खावें तर शेतां-तील लक्षावधि कीडमुंग्यांची, उंदीर-घुशींची, साप-सुरवंटाची हत्या ! झाडपाला, फळें खावीं तर वनस्पतीही जीवच ! ! कांहींच न प्यावें, न खावें, तर मनुष्य-जातची जात ठार ! मशकासाटीं मनुष्याचा वध, बारगुड्यासाठी ब्रह्महत्या, सापासाठीं साधूचा घात ! ! रोगाणूही जीवच—अर्थात् औषधालयें म्हणजेच कसाअीखाने ! ! जंताची पूड घेतली तर जत—म्हणजेच अगदीं आपल्या पोटीं आलेले जंतु—मरणार ! न घेतली तर मनुष्य मरणार ! क्षयावर औषध घेतलें तर क्षयजंतु क्षयानें रोडावणार, त्यांना असह्य दुःख होणार; न घेतलें तर त्या स्पर्शजन्य सांथीनें शतावधि माणसें मरणार ! नारूवर दया करावी तर मनुष्याला असह्य दुःखांत पिचावें लागणार, मनुष्यावर दया करावी तर नारूचा किडा रक्त, पू न मिळून अुपाशी मरणार !

माजराच्या हातून अंदीर सोडवावा तर माजरास दुखविले जाणार, न सोडवावा तर अंद्राचा गळा घोटला जाणार ! घरांत शिरलेल्या बुभुक्षित वाघावर दया करावी तर कोंवळ्या लेकराचे कट कडाकड फोडले जाणार, लेकराला वाचवावयास जावें तर वाघाचा कंठनाल कापावा लागणार ! कच्चें धान्य फाकावें तर माणसें पोट फुगून मरणार, तें दळावें, काडावें, राधावें तर त्या त्या कृत्यात वातावरणीय शतावधि जंतू कुटले, दळले, जाळले जाणार ! अेवढ्यासाटीं दयाशील स्मृतिकारानीं पांच हत्याच्या 'पंचसुनादोषपरिहारार्थम्' वैश्वदेव करावा म्हणून आज्ञापिलें; पण त्या पांची हत्यात जितके जीवजंतु मारले गेले असतील तितके त्या वैश्वदेवाच्या प्रदीर्घ कुंडांत पुन्हा जे जिवंत जाळले जातात त्याचें काय ? अशक्य ! अशक्य ! सर्वांगपूर्ण, यथावत् भूतदया, 'दया सर्वेषु भूतेषु' आचरणें मनुष्याला अशक्य आहे ! त्या वाटेच्या प्रत्येक पावलावर नी वर्तुळावर दुर्लंघ्य अडसर सृष्टीनेंच लावला आहे कीं, 'जीवो जीवस्य जीवनम् ! !' मनूनें सृष्टिनियमांचें सार ज्या अेका सुरेख श्लोकांत ग्रंथिले आहे तोच या महनीय प्रयोगानें सिद्धिलेला सिद्धांत कीं—

**चलानामचला भक्ष्या दंष्ट्रिणामप्यदंष्ट्रिणः ।**
**अहस्तानाम् सहस्ताश्च शूराणांचैव भीरवाः ॥**

## दांभिक शब्दच्छल

परंतु शतकोंशतकाच्या प्रयोगानें सिद्धिलेला हा सिद्धान्त डोळ्यांआड करून पुन्हा आपलें 'मी अहिंसेस वा भूतदयेस सर्वथैव आचरूं शकतों. सर्व मनुष्यांनों, तुम्हीही तसा तो धर्म आचरा' असा हटवादी अुपदेश कोणी कितीही सदिच्छेनें जरी करू लागला, तरी तो दांभिक शब्दच्छलाच्या खड्डयात पडल्यावांचून रहात नाहीं ! बौद्धांनीं पळवाट काढली कीं, दुसऱ्यानें मारलेलें मास खाण्यास हरकत नाहीं. नसेल ! पण ती कांहीं यथार्थ अहिंसा नव्हे ! अनुमन्ता हा जसा विशासिता तसाच अेक घातक, हें मनूनें स्पष्टच सांगितलें आहे. चोरीचें द्रव्य लाटणें हीही चोरीच. जैनांत राज्यकर्ते झाले, लढाया केल्या, शेंकडों सैनिक मारले; पण ती म्हणे हत्या नाहीं ! कां ? तर 'मन्युस्तन्मन्युमर्हति' ! 'त्यांच्या अपराधानेंच त्यांना मारलें, मीं नाहीं !' हा केवळ शब्दच्छल ! साप मुलाला डसूं लागला असतां त्याला मीं काठीनें मारलें; जर सापाचा अपराध सापाला मारता तर 'मन्युस्तन्मन्युमर्हति'

हें म्हणणें शोभतें ! खरी गोष्ट हीच कीं, त्याच्या अपराधासाठीं पण सापाला मारलें मीं ! ! यथावत् अहिंसा वा सर्वेषु भूतदया आचरणें मला अशक्य झालें ! घरच्या साखर-गुळाच्या डब्यातून झालेल्या मुग्याना चुलीवर चटके देअून मारायचें नी मग चिमूटभर साखर घेऊन वारुळातील मुंग्याना चारायची ! भूतदया आहे ही, पण ती निरपवाद नव्हेच नव्हे !

## महात्मा गांधींचीच अगदीं चालू गोष्ट घ्या !

मुळातच जे असाध्य तें साध्य आहे, अशा सदिच्छ अभिनिवेशानें कायावाचामनसा अहिंसेचें निरपवाद आचरण करा, मी करतोंच आहें, अशा बाण्यापायीं त्या सत्पुरुषालसुद्धा किती शब्दच्छल नी विसगत वर्तन करावें लागलें तें दोनतीन अुदाहरणानीदेखील स्पष्टता येते. दूध पिणेंसुद्धा हिंसा. कारण रक्ताचें दूध बनतें ! म्हणून त्यांनीं एकदा दूधच वर्जिलें. पण पुढें देहस्वास्थ्यास्तव दूध अवश्य झालें, तेव्हा गायीचें दूध तेवढें वर्ज्य, बकरीचें चालेल, म्हणून तें सेविण्यास आरंभिलें ! पण बकरीचें दूध काय रक्ताचें नसतें ? बकरीचें दूध काय निर्भेळ गंगोदकापासून बनतें ? साप डसतो तरी त्याला मारूं नये, सोडून द्यावें, म्हणून सारखे उपदेशिलें; पण पिसाळलेल्या कुत्र्यानीं प्रळय माडला तेव्हा त्याना मारावें, महती हिंसा टाळण्यासाठीं लघुहिंसा करावी, असें फर्मान सोडून पिसाळलेली कुत्री मारविली ! मग त्याच कारणासाठीं साप का मारूं नये ? हा निव्वळ शब्दच्छल आणि त्याला दंभाचाही दुर्गंध ! ! प्लेग हटविण्यासाठीं लोकांनीं उंदीर मारले तर त्याची निंदा केली ! अुंदिरालाही जीव नाही का ?—म्हणून दुड्ढाचार्यी थाटात प्रश्न केले ! पण साप का मारूं नये, हें सागतांना साप अुंदराना खातात म्हणून शेतीस अुपकारक, हें कारण दिलें ! अुंदीर सापाकडून मारविणें ही काय हत्या नव्हे ? चोरी करण्यासाठीं चोरांना नोकर ठेवणें हा काय सावाचा धंदा ? त्याच्या केळयाच्या बागेवर माकडांची धाड पडली, ती गीतेच्या अुपदेशानें काहीं जाअीनां. तेव्हा 'कमींत कमी हिंसेंत' माकडाना कसें मारतां येअील याचे अुपाय शोधले ! हा शिखाचा 'झटका'च नव्हे काय ? पूर्णपणें अहिंसक ब्रीदाला ते मुळींच धरून नाहीं. प्लेग पसरूं नये म्हणूनसुद्धां अुंदीर मारणें पाप, असा गांधीजींसारखा वाह्यात अुपदेश देणारा जर कोणी, गांवातून मलेरिया हटविण्यासाठीं, डबक्यांतील डासाची कत्तल करण्यासाठीं त्याच्यासारखाच निघाला, तर डासदेखील त्याला हंसण्यास सोडणार नाहींत कीं 'आतां कोठें गेला आहे राधासुता तुझा धर्म ?'

गाधीजींना अेकदा अपेंडिसाअिटिस झाला, तेव्हा त्याच्या देहातील रक्तावर त्या रोगाणूंची वसाहत आनंदानें नादूं लागली. पण पुढें त्यावर शस्त्रक्रिया करवून त्याची ह्यानीं कत्तल अुडविण्यास सोडलें नाहीं. स्वतःचा अेक जीव वांचविण्यासाठीं त्या शतावधि जीवांचा नाश केला ! तो कां ? जीवाजीवात तुल्ना करावयाची, हिंसाधर्म निरपेक्षपणें न आचरता सापेक्षतःच आचरणें अवश्य, हेंच ना त्याचें समर्थन? आतां या वर्षी गाधीजींना मलेरिया झाला तेव्हा रुग्णालयात जाअून त्यावर औषध घेअून ते रोगजंतु मारून त्यांनीं स्वतःचें आरोग्य राखलेंच कीं नाहीं ? गुरुवायुपूरच्या देवालयप्रवेशासारख्या अनेक प्रसंगीं काहीं जणाच्या भावना अितक्या दुखल्या कीं, त्यानीं महात्माजींचाच भस्मासुरी मंत्र अुलटा मारून अन्नसत्याग्रह केले. 'गाधींना मला भेटूं द्या, नाहींतर मी दाराशीं अुपाशी मरतो,' म्हणून अेक जण गाधीजींच्या नी मरणाच्या दाराशी बसला. पण अशा प्रत्येक साध्या प्रश्नींदेखील गाधीजींनीं साफ उत्तरें दिली कीं, 'तुम्ही वाटेल तितके जण मरणीं मेलेत, तरी चिंता नाहीं. मी माझी चळवळ सोडणार नाहीं. नुसती भेट देण्यावारीं जरी तुझा जीव वाचत असेल, तरी तो वांचविणार नाहीं ! वाटेल तर भेट देअीन, नाहीं तरी नाहीं.' आणि त्या पायी त्या अन्नसत्याग्रहींच्या जीवाना अतोनात क्लेश नी अुपासमार सोसावी लागली ! ही काय निरपवाद भूतदया ? निरपेक्ष अहिंसा ? अेक गायीचें वासरू दुःसाध्य दुखण्यानें तडफडूं लागलें; त्या दुःखाची दया येअून गांधीजींनीं त्याला गोळी घालून टार करविलें ! ही दया असो वा नसो, पण निरपेक्ष भूतदया, निरपवाद अहिंसा नव्हेच नव्हे ! असलीच तर तुलनात्मक अहिंसा, सापेक्ष भूतदया असेल !

### तर मग शक्य त्या तौलनिक भूतदयेची, सापेक्ष अहिंसेची कसोटी कोणची ?

मनुष्याला शक्य नी अिष्ट अशा भूतदयेची आजवरची कसोटी म्हणजे ज्याचे त्याचे धर्मग्रंथ समजली जाई. आपल्या धर्मग्रंथांपलीकडे अितर धर्मग्रंथाचें ज्ञान किंवा बहुतेक प्रकरणीं अस्तित्वसुद्धा जेव्हा निरनिराळया राष्ट्राना माहीत नव्हतें, तेव्हा आपल्यापुरता आपला धर्मग्रंथ कसाबसा बरा वाटत होता. पण आतां सर्व धर्मांच्या तुलनात्मक ज्ञानाच्या या युगांत त्याच्यांतील विसंगति अितकी स्पष्ट झाली आहे कीं, त्यांची ह्या प्रकरणांतील कसोटी अगदी कुचकामी नी हास्यास्पद ठरावी ! ह्या ग्रंथांच्या आधारें मुसल्मान डुक्कर खाणार नाहींत, गाय खातील; हिंदु डुक्कर

खातील, गाय खाणार नाहींत; ख्रिश्चन डुक्कर नी गाय दोन्ही खातील; बौद्ध मेलेलें वा मारलेलें डुक्कर खातील, मारणार नाहींत; जैन, वैष्णव यापैकी काहींच खाणार नाहींत !! नुसती ब्राह्मणाचीच गोष्ट घेतली, तरी बगाली ब्राह्मण मासे खातील, मास, कोबडी खाणार नाहीत; कनोजी मास खातील, मासे, कोबडी खाणार नाहीत; दाक्षिणात्य मीमासक यज्ञातील मास खातील; अितर ब्राह्मण मास, मासे, कोबडी, यज्ञीय-अयज्ञीय काहींही खाणार नाहीत, पण कॉडलिव्हरच्या बाटल्यांचा मात्र फन्ना पाडतील ! ज्यू लोकाचा, मुसलमानाचा नी हिंदूतील स्मार्तांचा, जैनांचा असे धर्मग्रंथ अेकत्र करून त्यातील खाद्याखाद्य पदार्थाच्या तालिका ( tables ) एका-समोर अेक ठेवल्या कीं, या प्रकरणीं त्याच्यात निर्बुद्ध विसगति ओतप्रोत भरलेली आहे आणि अेकाच देवाची ती त्रिकालाबाधित नी सार्वदेशिक आज्ञा कशी होअूंच शकत नाहीं तें तत्काल ध्यानात येअील. धर्मग्रथाची कसोटी अेकदर भूतदयेच्या प्रकरणीं अशीच निकम्मी आणि टाकाअू असल्यामुळें मनुष्यानें भूतदया वा अहिंसा किती, कशी नी कोठवर आचरावी, याची त्यातल्या त्यात अधिक बुद्धिग्राह्य नी स्पष्ट अशी कसोटी अेकच अेक असते. ती म्हणजे अैहिक मानवी हितास जी पोषक तितकीच भूतदया आचरणीय, अिष्ट ! त्यापलीकडे भूतमात्रावर दया करण्याची मनुष्यास जी सोय नाहीं, मनुष्याच्या हितास अवश्य तेव्हा तेव्हा हिंसा जी केलीच पाहिजे, तिचा दोष मनुष्यावर नाही ! तो दोष असलाच तर सृष्टीचा, निसर्गाचा. अिच्छा असलीच तर प्रभूची ! या मनुष्यहिताच्या कसोटीनें वरील धार्मिक विसगतता नी वैचारिक गाधीगोंधळ पुष्कळ अंशीं टाळता येतो. साप-विंचू प्रभृति प्राणी मिळेल तेथे निःशंकपणें मारावे ! कांहींजण नागी कापून विंचू सोडतात ! पण असली दया म्हणजे भूतदया नसून भूतबाधा असते. कारण नांगी कापलेला विंचू जरी पुन्हा डसला नाहीं, तरी नागीवाल्या विंचवाची वीण वाढविण्याचें काहीं सोडीत नाहीं ! हिंस्र पशूची मृगया अवश्य करावी. अुपयुक्त पशू संरक्षावे. मोर, नाना सुरंग सुरेख पिसाचे पक्षी रानात राखावे. अुपद्रव न होअील अशा बेतानें हत्तीसारखे शोभिवंत नी माणसाळू प्राणी वधूं नयेत; मनुष्यास अुपद्रवूं लागले तर बेशक ठार मारावे. घोडा, अुंट, गाय, बैल, शेळ्या, मेंढ्या, कुत्रें मनुष्यास अत्यंत अुपयुक्त; असे सर्व पशु ममतेनें पाळावे; त्यांना निष्कारण क्रूरपणें वागवूं नये. पण मनुष्यास अुपद्रवूं लागले तर लगेच गोळी घालावी. आहाराविषयीं आपल्या लोकानीं तर स्वतःवर घातलेले भूतदयेचे

प्रतिबंध अितके त्रासदायक आहेत कीं, त्यापायीं सहस्रावधि मनुष्यें मारल्याचें महापाप नी मनुष्यहत्येचा अपराध आपण सारखा करीत आलों आहोंत, हें आपल्या ध्यानातही येत नाहीं! कोणत्याही दुष्काळाची गोष्ट घ्या. असलेलें अन्न न खाता ज्या भूतदयेपायीं लाखो मनुष्यें दुष्काळात उपवास काढतात, ती भूतदया का भूत-बाधा?

समुद्रकाठच्या विस्तीर्ण दक्षिण भारतात दोहों बाजूंना असलेले लक्षावधि ब्राह्मण, वैष्णव व जैन प्रभृति निरामिष लोकाना मत्स्याहाराची किती चागली सोय आहे! दोनतीन वर्षांच्या दुष्काळानेंही समुद्र कांहीं आटत नाहीं. अशा कठीण प्रसंगीं तरी या जातींतील दुष्काळग्रस्तांच्या अुपजीविकेस मत्स्याहाराचें कितीतरी साहाय्य मिळेल! माशांचे प्राण वाचविण्यासाटीं आपल्या मुलांमाणसाचे प्राण अन्न अन्न करीत तडफडूं देण्यात भूतदया ती काय साधली? मत्स्याचे प्राण तेवढे दयेस पात्र आणि स्वतःच्या मुलालेकरांचे प्राण काय केरकचरा आहेत? तीच गोष्ट कोंबडी, ससे, पक्षी प्रभृति प्राण्याची. मासाहार, शाकाहार हा सुकाळात ज्यांच्या त्याच्या रुचीचा आणि प्रकृतीचा प्रश्न असावा; पण दुष्काळात वा अडचणींत पचेल तें ते अवश्य खावें! कोणचें मास खाद्य तें धर्मग्रंथाच्या टिपणींत न पाहता वैद्यकाच्या कोष्टकांत पहावें. वैद्यकदृष्ट्या कोणास डुकराचें मास हितावह असेल, तर त्याला तेंच धर्म्य. मनुस्मृतींत तर वराहाचें मांस खाण्याचा ब्राह्मणांना देखील जवळ जवळ आग्रहच केलेला आहे. जे डुकर खात नाहींत त्यांचें म्हणणें असतें कीं, डुकर घाण खातें यासाठी तें धर्मतः निषिद्ध मास! पण गायही घाण खाते! आणि सगळ्यांत सर्वभक्षक जात जर कोणाची असेल तर ती म्हणजे मासे! गदळ घाण जलप्रवाहांत टाकावयाचा अवकाश कीं, खिस्तमस केकच्या पक्वान्नावर नाताळांत युरोपियन जसे लालसेनें तुटून पडतात, तसे मासे त्यावर बुभुक्षेनें तुटून पडतात! मग मासे वा गाय धार्मिक खाद्य म्हणून खाणाऱ्यांनीं रानडुकराच्या मासालाच तेवढें नाक का मुरडावें? पोथींत आहे म्हणून; दुसरें काय? तोच विवेक गायीसही लागू. गाय, बैल, म्हैस हे दूध नी शेतीकाम या दृष्टीनें मनुष्याच्या अत्यंत अुपयोगी, माणसाळू असे पाळीव पशु. त्याना शक्य त्या दयेनें पाळावें. पण तरीही ज्या परिस्थितींत त्यांच्यावर दया केल्यानें मनुष्याच्या जिवावर बेततें, त्या परिस्थितीत काहीं ती दया अुक्त ठरणार नाहीं. राष्ट्रशत्रूचें सैन्य गायींच्या गोलआड दडलें तर गायींचा कळप कापून शत्रूंशीं गाठ घेतली पाहिजे. परकीय विपक्षाच्या देशांतील गायी, गायी म्हणून

काहीं रमणीय नव्हेत! त्यांच्या दुधावर आमचे शत्रू वाढतात–आम्ही नव्हत! हिंदुस्थानात दुभत्या गायी वा कामसू बैल खाण्यासाठी मारणें अेकदरीत कमी लाभदायक, म्हणून साधारणतः वर्ज्य; पण अिंग्लंड-अमेरिकेत तरी गोमास हे आम्हासमुद्धा अितर कोणत्याही मासासारखेच खाण्यास काही हरकत नाहीं. जो विवेक मासाशनाच्या प्रकरणीं, तोच भूतदयेच्या सर्व प्रकरणीं लागू पडतो. प्लेगासाठीं अुंदीर मारावे कीं माणसें मरू द्यावीं; बहुबीज वांगे खाणें पाप, का अेकबीजी आंबा; शेती करणें हिंसा, की बागाअीत करणें हिंसा; दिवसा खाणें भूतदया कीं रात्री; अित्यादि सर्व वाद आणि कुत्र्याचे पाजरपोळ घालणें, सापाना दुधाचे अुकाडे लावणें कोल्ह्यांसाठीं काकड्याचे मळे पाणविणें, ढेकणांना अुपास पडू नयेत म्हणून मुलाच्या, पाळण्यात नी मोठ्याच्या पलगात त्याची लागवड करणें–ह्या साऱ्या गोष्टी भूतदयेच्या नसून भूत-बाधेच्या होत! भूतदयेचा परिणाम नसून भूतबाधेचा खेळ आहे!

माणसांवर दया करून जर भूतमात्रावरही दया करता आली असती, तर ती अवश्य केली असती. ते अशक्य असले तरीही माणसाच्या हितास घातक असणाऱ्या प्राण्याचा नाश करतानासुद्धा मनाला काहींतरी दुःख होतेंच होतें; दयेची मळमळ बाधतेच बाधते. पण स्वतःच्या लेंकराला रोगापासून वाचविण्यासाठीं जेव्हां शस्त्रक्रिया करावी लागते, तेव्हां कासावीस होणाऱ्या आअीच्या हृदयाची ती दया जशी अप्रयोजक म्हणून दाबून टाकून लेंकरावर शस्त्रक्रिया करावीच लागते, तशीच भूतदयेची ही दुर्बलता, ही मळमळ मनुष्यहितार्थ दडपून टाकलीच पाहिजे. आज आपल्या अिकडे अशा प्रकारची मनुष्यहितघातक भूतदया दाखविणाऱ्याविषयीं अेक प्रकारची पूज्यबुद्धि अुत्पन्न होते, तो जसा काहीं अैक अलौकिक सद्गुण समजला जातो, साधुत्वाचें लक्षण समजलें जातें. पण वास्तविकपणें पहाता ती अैक नृशंस व्याधि आहे. ती भूतदया नसून भूतबाधा आहे! मनुष्यघातक अपराध आहे! मानसिक दुर्बलता आहे! जी मनुष्यासच घातक, ती दया 'दया सर्वेषु भुतेषु' होअील तरी कशी? कारण सर्व भूतात मनुष्यही आलाच! सृष्टीच्या, आम्हांस सर्वस्वीं असुधारणीय असलेल्या व्यवस्थेशीं नसती घासाघास करण्यापायीं 'अिदं च नास्ति परं च न लभ्यते' अशी फजीति करून घेण्यापेक्षां, मनुष्यानें जें साध्य तितकें तरी साधावें हेंच अुत्तम. जी मनुष्याच्या हितास पोषक वा निदान अविरोधी तितकीच भूतदया पाळणें अेवढेंच काय तें त्याचें कर्तव्य, तोच याविषयींचा खरा सृष्टिविहित मानवधर्म!!

# बारावा किरण

## तत्काल बहिष्कार्य असे कांहीं परकी शब्द

विपश्चित्संमतस्यास्य किंस्यादज्ञविडंबनैः ॥
रोचते किं क्रमेलाय मधुरं कदलीफलम् ॥ १ ॥
( रघुनाथ पंडितकृत 'राजव्यवहारकोश' )

भाषाशुद्धीची तात्त्विक चर्चा, अनावश्यक त्या त्या जुन्या वा नव्या परकीय शब्दांचें स्वभाषेंतून शक्य तों अुच्चाटण करावें कीं नाही, याची अवश्य तितकी भवति न भवति, आता झालेली आहे. महाराष्ट्र साहित्य संमेलनामध्यें जळगावला 'अुर्दू जुने शब्द स्वभाषेत जे घुसले ते काढूच नयेत' अशा अर्थाच्या अेका ठरावात असलेला विक्षिप्त तेवढा भाग गाळावा अशी अुपसूचना घसघशीत बहुमतानें जी या वर्षी संमत झाली तीच भाषाशुद्धीच्या चळवळीच्या प्रस्तुत प्रगतीचें अुत्कृष्ट मापन नी प्रबळ पुरावा होय.

सामाजिक, राजकीय वा वाङ्मयीन, कोणचीही सुधारणा म्हटली कीं, प्रथमतः तिचा काहीं तात्त्विक खल अवश्यच असतो. परंतु तिचें खरें यश ती व्यवहारून दाखविण्यावरच अवलंबतें. ती अिष्ट कीं अनिष्ट, शक्य कीं अशक्य, तें नुसत्या शाब्दिक चर्चेनेंच काय तें सिद्धिणे बहुधा दुर्घटच असणार. परंतु ती ज्या नेटानें

किर्लोस्कर मासिक, जानेवारी १९३७

आचरणांत आणून सोडली जाते त्या प्रमाणात तिचे सुपरिणाम नी सुसाध्यता प्रत्यक्षपणेंच प्रत्ययास येत चालल्यानें पूर्वीच्या विरोधकामध्यें जे प्रामाणिक असतात तेच तिचे समर्थक होतात, आणि जे अप्रामाणिक असतात त्याचीही तोंडें बंद पडल्यावाचून रहात नाहीत.

यास्तव आम्ही प्रथमपासून अेकीकडे तात्त्विक चर्चेचा धडाका चालू ठेवीत असताही तिच्यावरच न थांबता किंवा शाब्दिक संमतीच्या टरावाची वा असंभव अेकवाक्यतेची वाट पहात न बसता, दुसरीकडे आमच्या लेखातून, भाषणातून नी प्रत्यहींच्या संभाषणातून अुर्दू, इंग्रजी प्रभृति जुन्या वा नव्या परशब्दाना प्रत्यक्षपणें बहिष्कारण्याचाही शक्य तो प्रयत्न करीत चाललो, ती भाषिक सुधारणा लगोलग व्यवहारीतही चाललों. आमच्याप्रमाणेंच श्री. आठवले प्रभृति अनेक भाषाशुद्धीच्या अभिमान्यानीं ती सुधारणा आचरून दाखविण्याचा यथाशक्ति अुपक्रम चालविला. त्यामुळेंच ती चळवळ आज अितकी बळावलेली आहे. त्यांतही प्राध्यापक माधवराव पटवर्धन यांनीं तर आता साहित्य समेलनाचें आपलें अध्यक्षीय भाषणही अनावश्यक परकीय शब्दाचा स्पर्शही न झालेल्या शुद्ध मराठींतच लिहिलें आहे ! साहित्य समेलनाच्या अध्यक्षीय भाषणामध्यें भाषाशुद्धीच्या दृष्टीनें अकलंकित अशा मराठी भाषेंतील पहिलें भाषण करण्याचा मान प्राध्यापक पटवर्धनांनींच पटकावला हें त्यांचें वैशिष्ट्य चिरस्मरणीय होय ! भाषाशुद्धीची सुधारणा नुसत्या तात्त्विक चर्चेच्या दल्दलींतच रुपत न ठेवता ती आपल्यापुरती तरी आचरणात आणून सोडण्याच्या त्याच्या ब्रीदाविषयीं आम्ही प्राध्यापक माधवराव पटवर्धनांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. सुधारणा नुसती सुचवून दाखविणारे बहुत; ती करून दाखविणारेच अल्प ! कोणतीही सुधारणा जी यशस्वी होते ती मुख्यत्वें ह्या करून दाखविणाऱ्यांच्याच बळावर होय !!

ह्यासाठींच भाषाशुद्धीचा जो अनुयायी नी अभिमानी वर्ग महाराष्ट्रांत गेल्या सातआठ वर्षांच्या नेटाच्या चळवळीमुळें अुत्पन्न झालेला आहे आणि सारखा वाढत आहे, त्यास आमचें असें सांगणें आहे कीं, आतां त्यांनीं भाषाशुद्धी करावी कीं न करावी याचें चर्वितचर्वण करण्यांत फारसा वेळ न दवडतां, त्यांना ज्या प्रमाणांत ती पटली आहे, त्या प्रमाणांत ती व्यवहारून टाकण्यावरच मुख्य भर द्यावा. अनवश्यक परकी शब्द, जुने वा नवे, मी माझ्या संभाषण-भाषण-लिखाणांतून

नाहीं तर नाहींच वापरणार, असें ब्रिरुद बांधून ते ते परशब्द सारखे ब्रहिष्कारीत चलावें, तदर्थक आपले जुने वा नवे शब्द सारखे अुपयोजीत चलावें. आपण जितक्या नेटानें ते व्यवहारीत राहूं तितक्या त्वरेनें ते जुने विलुप्त नी नवे अुद्भावीत असे स्वकीय शब्द रूढावले जातीलच जातील; आणि त्याच प्रमाणांत सध्यां बोकाळलेले ते ते परशब्द भाषेंतून लोपू लागतीलच लागतील. नुसत्या तात्त्विक चर्चेनें हें कार्य केव्हाही साधणार नाहीं. यास्तवच ह्या लेखांत आम्ही भाषाशुद्धि पटलेल्यांनाच काय तें मुख्यत्वेंकरून सबोधिणार आहोंत आणि त्याच्या अडचणी कशा टाळतां येतील, त्यानीं आपलें ध्येय कोणच्या निश्चित स्वरूपात पुढें ठेवलें पाहिजे, कोणकोणते परशब्द अगदीं तत्काल बहिष्कारून तदर्थी कोणत्या प्रकारें कोणत्या कसोटीनें स्वकीय शब्द अुपयोजिले पाहिजेत तेंच काय तें मुख्यतः दिग्दर्शिणार आहोत.

## भाषाशुद्धीची कसोटी

भाषाशुद्धीचें मुख्य सूत्र काय तेंच मुळीं लक्षांत न घेतल्यामुळें किंवा लक्षांत न आल्यामुळें तिचे बहुतेक विरोधक अुगीचच्या उगीच साप साप म्हणून भुअी बडवीत सुटतात आणि भरमसाट परशब्द वापरण्याच्या स्वतःच्या गबाळपणाचा अतिरेक झांकण्यासाठीं आक्रंदूं लागतात, "अहो, कोणताही परकीय शब्द असा वापरायचाच नाहीं असें म्हणणें हा शुद्धिवाद्यांचा निव्वळ अतिरेक आहे ! त्यायोगें छटा व्यक्तविता येत नाहींत, भाषाशब्ददारिद्र्य वाढतें !" त्या शंकेनें व्याकुळलेल्या मंडळीस आम्ही पुन्हा सागतों कीं, आपण भाषाशुद्धीची मूळ प्रतिज्ञा, मी परशब्दाना जी कसोटी लावूं अिच्छितों ती कसोटी आपण अेकदां पाठ करून टाका, अर्थ समजून घेअून पाठ करून टाका, म्हणजे आपल्या आक्षेपातील शेंकडा नव्वद आक्षेप आपोआप निरस्त होतील ! आपल्यांत जे प्रामाणिक आक्षेपक आहेत तेच तिचे समर्थक बनतील! कारण स्वभाषेचा अभिमान त्यांनाही आहेच आहे ! स्वकीय शब्द मारले जाअून त्यांच्या ठायीं विदेशी बाजारबुणग्याचा धुमाकूळ माजावा अशी काहीं त्याची अिच्छाच असणें शक्य नाहीं. त्याच्या शंकानिरसनासाठीं भाषाशुद्धीच्या प्रत्येक अभिमान्यानें भाषाशुद्धीची मुख्य प्रतिज्ञा नी कसोटी मुखोद्गत करून ठेवली पाहिजे. भाषाशुद्धीच्या प्रचारकांना स्वतःसही आपल्या ध्येयाची नी धोरणाची सुस्पष्ट कल्पना

कृष्णसारस्तु चरति मृगो यत्र स्वभावतः ।
स ज्ञेयो यज्ञियो देशो म्लेंच्छदेशस्त्वतः परः ॥ २३ ॥
अेतान् द्विजातयो देशान्संश्रयेरन्प्रयत्नभिः ।
शूद्रस्तु यस्मिन्कस्मिंश्च निवसेद्वृत्तिकर्शितः ॥ २४ ॥

( मनु २. टीकाही पहा. )

बरें, शिखऱ्यानीं नकळत मानले त्याप्रमाणें लोकमान्याच्या परदेशगमनानें केलेल्या शास्त्रातिक्रमणाचा नी अशुद्ध, अस्पृश्य नी आजन्म पतित झाल्याचा दोष सोडला, तरी श्री. शिखऱ्यानीं त्यांचा जो कळून सवरून गुण म्हणून सांगितला आहे त्याविषयीं तरी ' शास्त्र ' काय म्हणतें हे शिखऱ्यांनीं थोडेंसें न्याहाळावें ! ' लोकमान्य टिळक मांसाहार न करता ' ' शुद्ध राहिले ' ह्या शिखऱ्याच्या शब्दाशब्दात विसंगति नी विपर्यास भरलेला आहे ! जर खरोखरच देशीं वा विदेशीं लोकमान्यांनीं मांसाहार असा कधींच केला नसेल तर शिखऱ्यानीं ती गोष्ट अशी मोटमोठ्यानें तरी बोलू नये. जर का ती मनु भगवानाच्या कानांवर गेली तर टिळकाविषयीं त्याचें मत किती कलुषित होअील, याची शिखऱ्यानीं काहींतरी चिंता वहावी ! ब्राह्मण कुळात जन्मून मांस कधीं खाल्लें नाहीं म्हणूनच त्या अक्षम्य अनाचारास्तव लो. टिळकाना जे शास्त्रातिक्रमाचें महापाप लागलें तें ' शास्त्रा 'प्रमाणें अितकें मोठें होतें कीं, त्याची निष्कृति त्या थोर पुरुषाची सारी पुण्याअी देखील करू शकती ना ! वेदानुसार यज्ञपुरोडाश ब्राह्मणास प्रत्यहीं आचमनाप्रमाणेंच कर्तव्य ! वेदकालीं मांसाहार यज्ञीय कर्तव्य असे, हें काहीं पाश्चात्याच्या भाषांतरावरून कोणीं सांगावयास नको. स्वतः मनु भगवान् तो अितिहास सांगतात कीं, " बभूवुर्हि पुरोडाशा भक्ष्याणां मृगपक्षिणाम् । पुराणेष्वृषि यज्ञेषु ब्रह्मक्षत्र सवेपुच ॥ " ब्राह्मणक्षत्रियांनीं अनेक यज्ञात पशुपक्ष्याचा पुरोडाश सेविला आहे ! ( म. ५।२३ ) यज्ञाची गोष्ट सोडली तरी श्राद्धादिक आचारात तर मांस खाणें नी खावविणें अत्यंत शास्त्रीय, ब्राह्मणाचें अवश्य कर्तव्य. अितकेंच काय, पण " नियुक्तस्तु यथान्यायं यो मांसं नात्ति मानवः । स प्रेत्य पशुताम् याति संभवान्येकविंशतिम् ॥ "( म. ५।३५ ) जो श्राद्धांत मांस खाणार नाहीं त्यास अेकवीस जन्म पशुयोनि प्राप्त होअील, असा कचकचीत शाप आहे. शास्त्रांचा पाया–सर्व स्मृतींतील आद्यस्मृति जी मनुस्मृति–तींतच ! बरें, मांस तरी कसलें ? तर श्राद्धपक्षीं ब्राह्मणांना

प्रशस्त म्हणजे म्हशाचें मांस नी वराहमांस, रानडुकराचें! त्यायोगे पितरांची तृप्ति अेकच नव्हे तर दहा महिने होते! " दशमासांस्तु तृप्यन्ति वराहमहिषामिषैः ॥ " (म. ३।२७०). पितराच्या प्रकरणीं जें कर्तव्य तेंच पुत्राच्या प्रकरणीं. कारण प्रत्येक ब्राह्मणानें जन्मल्यानंतर पहिलें अन्न असें जें खाणें शास्त्रसमत, जो पुत्राचा अन्नप्राशनसस्कार, तोच सागतो कीं, ब्राह्मण अपत्याचें बाळकडूच मुळीं मांसाहार! कारण गृह्यसूत्रात अन्नप्राशनसस्काराच्या प्रसंगीं अपत्यास प्रथमान्न म्हणून समत्रक बकऱ्याचें मास, तित्तिर मास, वा मत्स्य यांचा रस्सा सेववावा, असेंच सागितलेलें आहे. अशा रीतीनें मासाहार करणें हें पाप नसून, अुलट न करणें हेच शास्त्रांनीं शास्त्रातिक्रमण गणलेलें आहे!

तेव्हां शास्त्रवचनाचें नाव दुसराअीवारीं सहसा कोणीं काढूं नये हेंच बरें. शास्त्र-वचनेंच जर पाहूं लागलो तर शकराचार्यापासून शिखऱ्यापर्यंत आपणां सर्वांची भबेरी अुडाल्यावाचून रहाणार नाहीं. शकराचार्यांचा संन्यास! हाच मुळीं अधर्म; कलिवर्ज्य!! लोकमान्यांसारख्या पुण्यश्लोक पुरुषानीं लोकहितास्तव त्याच्या कालांत त्यांच्या स्वभावानुसार काहीं शास्त्रवचनें तुच्छविलीं, कांहीं पाळलीं; कारण सहस्रावधि वर्षांपूर्वीचे सगळेच जुनाट विधिनिषेध जर आज कोणी व्यक्ति वा समाज पाळूं म्हणेल तर त्याला पुढें पाय टाकण्याची सोयच नाहीं! त्या समाजाला आज जगणेंच अशक्य! आमच्याविषयीं विचाराल तर, आपल्या हिंदु राष्ट्राच्या अभ्युदयार्थ आजच्या परिस्थितींत जो जो विधिनिषेध अुपकारक तो तो आमचें आजचें शास्त्र! त्याची ती अुपयोगिता हाच आमचा शास्त्राधार! आजच्या परिस्थितींत जो लोकधारणास साहाय्यक तोच आमचा आजचा धर्म!! आणि आम्ही त्याच " रक्षितसों धर्मातें आम्हासी धर्म ठाअुका नान्य ॥ "

# चौदावा किरण

## आजच्या तिबेटांतील कांहीं गमती !

भगवान् गौतम बुद्धानें प्रवर्तिलेल्या धर्मसुधारणांमध्यें अत्यंत आवश्यक अशी अेक सुधारणा ही होती कीं, मनुष्यानें अीश्वरप्राप्तीसाठीं स्वतःच्या देहास नाना प्रकारच्या अघोरी पापांनीं अुगीचच्या अुगीच दडूं नये. अुपाशी राहून मरणें, अेकाच पायावर अुभें राहणें, अेक हात वर अुचलून, तो लांकडासारखा निर्जीव नी बधिर झाला, तरी जन्मभर तसाच ठेवणें, खिळ्यांच्या टोंकाची शय्या तयार करून तीवर निजणें, अवयव जाळून घेणें, पचाग्नींत भर ग्रीष्मांत तापत बसणें, अित्यादि देहदंडनाचीं अघोरी तपें हीं काहीं कल्याणाचीं साधनें नव्हत. अशा आसुरी अुपायांनीं प्रसादणारा देव हा मनुष्यावर दया करणारा देव नसून मनुष्याचा अत्यंत छळक असा कुणी राक्षसच असला पाहिजे ! देव जर दयाळू असेल तर तो आपल्या भक्तांचीं अुपांगें विस्तवांत सरणापसारखीं खुपसून त्या शेगडीवर शेकत बसेल तरी कसा ? अशा कोटिक्रमानीं बुद्धानें अुग्र नी अघोरी अशा अनेक देहदंडनीय तपांचा, अुपासांचा नी यज्ञयागादिक हिंसात्मक कर्मकांडांचा तीव्र निषेध केलेला आहे, आणि वारंवार बजाविलें आहे कीं, लोकांचीं दुःखें निवारणें, रोग, अुपासमार, हत्या इत्यादि संकटांपासून लोकांची मुक्तता करण्यासाठीं सतत झटणें, हें खरें तप होय.

---

स्त्री मासिक, मार्च १९३७

निर्वाण होण्याच्या आधीं, मृत्युशय्येवर पडले असता बुद्ध भगवंतानीं आपल्या शिष्याना शेवटचा अुपदेश दिला :

"चरथ भिक्खवे चारिकं ।। बहुजनहिताय, बहुजनसुखाय, लोकानुकम्पाय अत्थाय हिताय सुखाय देवस्यानुशासनम् !!" ह्या अत्युदार शब्दात बुद्धानें धर्मप्रसाराचा आपला अंतिम आदेश दिला.

"जा ! भिक्षूनो, जा ! बहुजनाचें हित साधीत, बहुजनाच्या सुखास्तव, लोकांवर करुणा करण्यासाठीं, सतत झटत ह्या माझ्या अनुशासनाचा प्रचार दशदिशाना करा जा !"

ह्या आदेशास मस्तकीं धरून आपल्या आर्यावर्तातील लक्षावधि धर्मप्रचारक हिमालयांना आणि सागराना अुल्लंघून अेकीकडे अुत्तर ध्रुवाकडील ज्ञात टोंकांच्या हिममालांपर्यंत तर दुसरीकडे मेक्सिको-ब्राझिलच्या ग्वाटेमालापर्यंत (गौतमालयापर्यंत) या आर्यावर्तातील लक्षावधि बुद्ध भिक्षु त्या बुद्धानुशासनाचा सदेश सागत गेले ! जेव्हां प्रवास अत्यंत कष्टमय होता, बहुधा पायींच होता, तेव्हां गेले ! गोबीच्या वालुकारण्यांत, तिबेटच्या हिमारण्यांत, दक्षिण अमेरिकेच्या ग्रीष्मारण्यांत खडत, कुडकुडत, अुकडत, अनेकदा बंदिवास, छळ आणि हत्याही झाल्या असतां आर्यावर्तातील त्या लक्षावधि भिक्षूंनीं मनुष्यजातीची शतकोशतकें सेवा केली. ज्ञान, वैज्ञान, भाषा, शिक्षण, औषधि, शील, सयमाची आपली अमूल्य आर्यसंपदा "बहुजनहिताय बहुजनसुखाय च लोकानुकम्पाय" देशविदेशीं मुक्तहस्तानीं वेतरली. त्यांच्या काळांत नी त्यांच्या काळापर्यंत मनुष्यजातीची कोणींही केली नाहीं, अशी अतुलनीय सेवा नी शुश्रुषा ह्या लक्षावधि हिंदु भिक्षूंनीं केली आहे !

त्या वेळीं मोठमोठ्या दुर्लंघ्य पर्वतांना अुल्लंघून तिबेटमध्येंही आपले शतावधि संन्यस्त बुद्ध भिक्षु जाते झाले. सारा तिबेट भगवान् बुद्धाला शरण रिघाला.

पण प्रत्येक धर्ममताची, संघाची वा संस्थेची प्रगति जेव्हा काळाच्या प्रगतीच्या पाअुलाशीं पाअूल ठेवून चालू शकत नाहींशी होते, तेव्हा शेवटीं तिची दुर्दशा झाल्यावांचून रहात नाहीं. बुद्धसंघाची शेवटीं त्याच कारणामुळें तशीच दुर्दशा अुडाली. ज्या तत्कालीन वैदिक कर्मकांडाचा बुद्धानें तीव्र विरोध केला, त्याहून वेगळें पण तितकेंच कुटिल नी बुद्धिशून्य कर्मकांड बुद्ध धर्मांतही शिरलें. वेद त्रैकालबाधित नी अीश्वरोक्त प्रमाण नव्हे म्हणून बुद्धिवाद करणाऱ्या बुद्धाचे ग्रंथच

त्रिकालाबाधित नी ओश्वरोक्तासारखेंच अशंकनीय प्रमाण होअून बसले! देवाला नाकारणाऱ्या भगवान् बुद्धालाच त्याच्या अनुयायांनी महादेव बनवून टाकलें! वेदमंत्राचा शभर वेळा नुसता अुच्चार करीत राहिलें कीं मोक्ष मिळतो, वा पाअूस पडतो, वा संतति वा संपत्ति लाभते, वा शत्रू नष्टतात, अशी निष्ठा ठेवणाऱ्या धर्मभोळेपणाची सारखी टर अुडविणारा जो बुद्ध त्याच्याच संघातून 'ॐ मणिपद्मेहम्' वा 'नमो बुद्धाय' अित्यादि मंत्राची लक्षलक्ष आवर्तनें केली कीं, भुतें पळतात, शत्रु हरतात, मोक्ष मिळतो, ही श्रद्धा बोकाळली! मंत्रतंत्राचें जंजाळ 'न भूतो न भविष्यति' असें वाढलें! देहदंडनाच्या तपाना अघोरी म्हणून निंदिणाऱ्या बुद्धाच्या धर्मात आसुरी देहदंडनाचे विलक्षण प्रकार धर्माचार होअून बसले; कुधारणा, भाबडेपणा, धर्ममूर्खता यांचा नुसता बुजबुजाट झाला!

कोणचीही व्यक्ति वा ग्रंथ त्रिकालाबाधित, अस्खलनीय, अशंकनीय असे सार्वकालीन परम प्रमाण मानले गेले कीं, त्या धर्माची नी समाजाची प्रगति खुंटलीच म्हणून समजावें! त्या व्यक्तीच्या वा त्या ग्रंथाच्या अुंची-लांबी-रुंदीहून तो समाज अधिक असा वाढूं शकतच नाहीं!—शकणार नाहीं! दोन हजार वर्षांपूर्वीची ती परम प्रमाण व्यक्ति वा तो सर्वज्ञानमय ग्रंथ असला तर तो समाज नी तो धर्म दोन हजार वर्षांनीं मागसलेलाच राहिला पाहिजे. मग तो ग्रंथ ओश्वरनिष्ठ नी ओश्वरोक्त वेद असो, अवेस्ता असो, बायबल असो, कुराण असो, वा अगदीं ओखादा अर्वाचीन असा शिखाचा गुरुग्रंथ असो; किंवा ती व्यक्ति निरीश्वरी वा अज्ञेयवादी कोणी बुद्ध असो, महावीर असो!

राष्ट्रचें राष्ट्र अशा धर्मभोळेपणापायीं भूतकाळाच्या खड्ड्यातल्या खड्ड्यांतच कसें दबून पडतें, अितर विज्ञानवादी समाज प्रगतीच्या पथावर अेक युगचें युग पुढें गेले असतांही तें धर्मभोळें राष्ट्र सहस्रावधि वर्षापूर्वीच्या अज्ञानातच कसें चाचपडत मागासलेलें रहातें, त्याचें कोणास जर अेखादें अुत्कृष्ट अुदाहरण हवें असेल तर त्यानें अेकदा आजच्या तिबेटाचें छायाचित्र पहावें!

तिबेट देशाची राज्यघटनाच मुळीं अंधश्रद्धेच्या धार्मिक साच्यांत ढाळलेली! तिबेटच्या राज्यशक्तीचा मुख्य कर्णधार, तिबेटचा राज्यकर्ता नी अधिशास्ता, हाच मुळीं संन्यस्त भिक्षु संघाचा जो धर्माध्यक्ष तो असतो. त्यास दलाअी लामा म्हणतात. तिबेट देशाच्या, धर्माच्या नी राज्याच्या रक्षणाचा सारा भार 'चेकयाग' ह्या

देवतेनें आपल्या शिरावर घेतलेला आहे आणि ती देवता कोण्या ना कोण्या व्यक्तीमध्यें स्वेच्छेनुसार संचरत रहाते, असा तिबेटच्या राज्यशासनाचा मूळ सिद्धात! ह्या देवतेचाच अभिप्राय प्रत्येक राजकीय अशा महत्त्वाच्या प्रश्नीं घेतला जातो, नी तिच्या अभिप्रायाप्रमाणें सधिविग्रहादि महत्त्वाचें राजकारणही हाकलें पाहिजे, ही राजनीति! अवलोकितेश्वराची अेक मूर्ति आहे, ती बोलूं शकते, असा विश्वास आहे आणि राज्याविषयीं, दलाअी लामाविषयीं, रोगपरचक्रादिकाच्या आपत्तीच्या प्रसंगी तिचाही दैवी अभिप्राय विचारण्यात येतो.

दलाअी लामा मृत्यु पावला, तरी तो मेला असें समजावयाचें नसतें. अेक व्यक्ति मेली तेव्हा आता राज्यपदावर दुसरी स्थापायची, तिची निवड कशी करावयाची, हा प्रश्नच त्याच्यापुढें नसतो. कारण तिबेटच्या राज्यशास्त्रातील सिद्धाताप्रमाणें दलाअी लामा ही व्यक्ति मुळीं मेलेलीच नसते! दलाअी लामानें अेक देह सोडला न सोडला तोच तो तिबेटमध्येंच कुठेतरी नवा जन्म घेतो, नव्या देहात प्रवेश करतो. प्रजेचें काम अेवढेंच कीं, त्या दलाअी लामानें तो जन्म तिबेटात कुठे घेतला आहे, तेवढें शोधून काढावयाचें!

तो शोध कसा लावायचा? त्याच्या अनेक आश्चर्यकारक पद्धती राज्यघटनेनुसार ठरलेल्या आहेत. 'चेकयाग' या राष्ट्राध्यक्ष देवाचा सचार होअून तो काहीं जें सागेल, ते साधन अेक; अवलोकितेश्वराच्या मूर्तीच्या मनात बोलावयाचें आलें, आणि अशा वेळीं ती तिच्या पुजाऱ्यासमक्ष तरी अेकांती बहुधा कांहीं ना कांहीं बोलल्यावाचून सहसा रहात नाहीं, तें साधन आणखी अेक; पण ह्या वा अितर साधनापेक्षा मुख्य निर्णायक साधन म्हणजे दलाअी लामा ज्या क्षणीं पूर्वीचा देह ठेवते झाले तो क्षण! अिकडे ज्या क्षणीं त्यानीं अेक देह ठेवला, त्याच क्षणीं दुसऱ्या देहात प्रवेशून जन्म घेतला असलाच पाहिजे! यासाठीं अगदीं त्या क्षणीं कोणाचें बालक जन्मलें, त्याचा साऱ्या तिबेटभर करून शोध केला जातो. जर त्या क्षणीं जन्मलेली अेकाहून अनेक मुलेंही सापडली—असें कधीं कधीं होतेंच—तर त्या सर्वांना आणवून धार्मिक अशा मंत्रतंत्र-जपजाप्याच्या मोठ्या अवडंबरासह पुढच्या परीक्षेसाटीं राजकीय डौलात ठेवलें जातें. सर्व राज्यातील मुख्य मुख्य अधिकारी—म्हणजेच पुरोहित भिक्षुकवर्ग—अेकत्र बोलविण्यात येतात! तिबेटात राज्याधिकार हा धर्माधिकाराहून भिन्न नाहींच! यामुळें सारे राजकीय अधिकारी बहुधा भिक्षुकमंडळांतीलच असतात. भिक्षूंचीं सैन्येंही असतात. त्या साऱ्या

प्रमुख भिक्षुमंडलाच्या पोथ्यापुराणातील शकुनादिक शंकाकुशंकांचें समाधान होऊन जर अेखादें मूल दलाअी लामाच्या लक्षणाहीं युक्त ठरलें तर लगेच 'श्री दलाअी लामा सापडले!' म्हणून साऱ्या राज्यभर दवंडीवर दवंडी पिटविली जाते! गावोगांवीं आनंदोत्सव चालू होतो.

परंतु प्रत्येक दलाअी लामाच्या देहत्यागानंतर त्यानें पुनर्जन्म घेतलेलें मूल मोठें होअीतों जो कित्येक वर्षांचा काळ जातो, त्यात राज्यव्यवस्था कोणाच्या हातीं देण्यात येते? काय प्रकट योग्यतेनें जो राज्यधुरा वहाण्यास समर्थ असतो त्याच्या हातीं? छट्! तोही प्रश्न दैविक, धार्मिक, भाबडट कसोटीनेंच सोडविला जायचा! चेकयांग सांगेल किंवा अवलोकितेश्वराच्या मूर्तीपुढें चिट्ठ्या टाकून जो कौल मिळेल, त्या व्यक्तीस राज्यपालक नेमण्यात येते. जोंवर तो अर्भक दलअी लामा सापडला नाहीं किंवा मोठा झाला नाहीं तोवर!

बरें, केवळ दैविक आदेशानुसार दलाअी लामा वा राज्यपालक नेमण्याच्या या खुळचट प्रकारामुळें कट, कारस्थानें, लाचलुचपत ह्याना तरी आळा बसतो काय? मुळीच नाही! दलाअी लामा ज्या क्षणीं देहत्याग करतो, त्याच क्षणीं आपलें मूल जन्मलें, म्हणून खोटेंच सांगणारे आअीबाप अनेक निघतात. जीं दोन वा दहा मुलें सर्व राष्ट्रात तेव्हाच जन्मली म्हणून पुढें आणली जातात, त्याच्यात्याच्याशीं हितसंबंध असणारे पक्ष आपापलाच मुलगा खरा पुनर्जन्माचा दलाअी लामा होय, हे सिद्ध करण्यासाठीं वाटेल तो बरावाअीट मार्ग स्वीकारून भांडणतंट्याना सिद्ध होतात. चिठ्या टाकण्यात लबाडी झाली किंवा पुजारीच खोटें बोलला, अशी शंका वाटून, किंवा चेकयांग देव संचारलेली व्यक्ति पक्षपाती वा मिथ्याचारी आहे असा आक्षेप निघून, पक्षविपक्ष माजायचे ते माजतातच, वर्षानुवर्षे यादवी युद्धे चालायचीं तीं चालतातच!

पुन्हा अत्यंत खुळचट असा पुनर्जन्मवादाचा कौल घेण्याची पद्धत स्वीकारल्यानें तिबेटावरचे हे राज्यशासक दलाअी लामा अेकाहून अेक वरचढ असे महापराक्रमी वा महाबुद्धिवान् राज्यकर्ते निपजले कीं काय? प्रत्यक्ष अनुभवान्तीं ठरले कीं काय? देवानें निवडलेले हे राज्याधिशास्ते, प्रकट गुणानुरूप माणसांनीं निवडलेल्या अितर देशांच्या अधिशास्त्याहून अधिक राज्यकार्यधुरंधर ठरले कीं काय? छे छे! अगदीं अुलट! देवानें नेमलेल्या म्हणून ज्या दलाअी लामांना तिबेटच्या धर्ममूर्ख

राज्यघटनेनुसार आजवर अधिशास्ते नेमण्यात आले, त्यातील एकही दलाअी लामा त्या चाभाराचा मुलगा जो स्टॅलिन किंवा लोहाराचा मुलगा जो मुसोलिनी त्याच्या पासगासही पुरण्यासारखा पराक्रमी निघालेला नाहीं, राज्यकार्यधुरंधर निघालेला नाहीं ! अुलट, त्या प्रकट गुणाहींच राज्याचे अधिशास्ते होणाऱ्या स्टॅलिन-मुसोलिनीसारख्या माणसाच्या तरवारींच्या तेजापुढें हे देवाच्या नावें निवडून आलेले दुर्बळ दलाअी लामा आणि त्यांचे राज्यदंड, सूर्यापुढें घुबड दिपावें तसे, दिपून गेलेले आहेत, जात आहेत! हे देवाचे प्रतिनिधि दलाअी लामा ज्याच्यावर सतत राज्य करतात, तो तिबेट चीनच्या साम्राटाचा शतकानुशतके दास झालेला आहे! देवासदेखील न मानणाऱ्या नी स्वतः लहानपणीं जोडे शिवून विकणाऱ्या त्या स्टॅलिनच्या प्रकट कर्तृत्वानें त्याचें रशियन राष्ट्र आज जें जगातील प्रबळतम राष्ट्र होअून बसलें, तें पहा! त्या लोहाराच्या मुलाला सेनाकर्ते नी राज्यकर्ते नेमणारें तें अिटलीचें प्रबळ राष्ट्र पहा! आणि आपल्या राज्याचे सर्वाधिकार त्या दलाअी लामाच्या हातीं सोंपविणाऱ्या या धर्मप्रमाण तिबेटचें हें पाप्याचें पितर पहा !!

तिबेटची वर दिलेली राज्यघटना जितकी भाबडट तितकीच त्याची राष्ट्रीय सैन्यघटनाही आचरट ! आचरट म्हणजेच देवखुळ्या आचाराच्या नी मंत्रतंत्र–जारणमारणाच्या जंजाळात गुरफटलेली ! दलाअी लामा मुख्य सेनापति; त्याच्या हाताखालील शतावधि मटातून मंत्रतंत्राच्या पूजापाटात जन्मभर मुरत पडणारे जेवढे भिक्षु ते सारे सैनिक; जुनाट पद्धतीची खड्ग, तोमर, त्रिशूळ, परशु हीं आयुधे–अगदीं नवीनातील नवीन भयंकर शस्त्र म्हणजे तोंडातून गजानी दारू टासावयाच्या तोड्याच्या काहीं बंदुका ! नाना प्रकारचे भोप्यासारखे चित्रविचित्र वेष केलेले आणि असली आयुधे परजलेले हजारो भिक्षु युद्ध पुकारलें जाताच रणांगणात अुतरतात !

आपणांस तर अशी कींव येअील कीं, भिक्षूंचें सैन्यबळ अर्वाचीन रशियाच्या लाल सेनेपुढें वा ब्रिटिशाच्या तोफापुढें कसें टिकाव धरील, तर त्या तुमच्या अश्रद्धेची तिबेटच्या देवसेनानी दलाअी लामालाही कींव आल्यावाचून रहाणार नाहीं ! कारण त्याचें हें नुसतें सैन्यबळ पाहूनच तुम्ही चकलांत ! पण ह्या मानवी सैन्यबळामागें असलेलें तिबेटचें दैविक आत्मबळ जे आहे, तें जर तुम्ही पहाल तर तुम्हीदेखील तोंडांत बोट घालाल नी म्हणाल कीं, रशिया तर काय, पण रशियाचा देव आला तरी त्याचें तिबेटच्या पुढें कांहींअेक चालणार नाहीं ! तें दैविक बळ

म्हणजे ह्या सैनिक बळाच्या मागोमाग येणारा हा हजारो भिक्षूंचा दळभार पहा ! त्याच्यापाशीं कोणच्याही अद्यावत् तोफा, बॉंब, विषारी वायु वा विमानाचें ज्याच्या-पुढें काहीअेक चालणारें नाहीं, अशीं हीं दोन अमोघ आयुधे जीं आहेत, ती पाहिलीत का ?

मानवी सैन्याच्या मागोमाग ते तिबेटचें दैविक सैन्य जे चाललेलें असते त्यातील शेंकडों भिक्षुवीर तोंडानें नाना प्रकारचे सैनिक मंत्र सत्रशः मोठमोठ्यानें पठत चालतात. त्या मंत्राहीं भारलेले हजारो ताअीत, गंडे, दोरे सैनिकाच्या गळ्यात, दंडात, हातात, वक्षस्थलावर अभेद्य कवचासारखे जखडलेले असतात. आपल्या इकडे सर्वारिष्टशांतिप्रीत्यर्थ जसें दुसरें काहींअेक करण्यापेक्षा अधिक भर कोण्यातरी कोपऱ्यांत पेटलेल्या यज्ञकुंडातील हवनावर टाकणें पुरेसें असते, तसेंच नाना प्रकारचीं तंत्रसाधनें मठामठातून अशा युद्धामध्यें जय मिळविण्यासाठी चाललेली असतात. मरणाचे नी अुच्चाटनाचे भयंकर मंत्र लक्षलक्ष वेळा आवर्तून या मंत्रित जलांचा वा मुठींचा मारा शत्रुसैन्याच्या प्रतिमेवर सारखा होत असतो. त्याचप्रमाणें त्यावाचून भुतें नी शत्रु पळविणाऱ्या लहानमोठ्या सहस्रावधि घंटाना सारखें बडवीत चालणारा आणि त्या तुमुल घंटानादाहीं दशदिशा कंपविणारा हजारो भिक्षूंचा दळभारही त्या मानवी सैनिक बळाला दैविक आत्मबळाचा पाठिंबा देत रणांगणावर चालून जात असतो, तो निराळाच !

जपाननें युरोपच्या तोडीस तोड म्हणून तोफेस तोफ, बॉंबला बॉंब, विमानास विमान भिडविलें खरें; पण जपानला ते करणेंच भाग होतें; कारण भुतें पळविणाऱ्या घंटा होत्याच कुठें मुळीं त्याच्यापाशीं ! !

आता तिबेटच्या सामाजिक स्वरूपाची काहीं कल्पना येण्यासाठी त्याचे दोनतीन विशेष सांगूं.

पहिली महत्त्वाची नी अभिनंदनीय गोष्ट म्हणजे ही कीं, तिबेटात जातिभेद मुळींच नाहीं. सर्वजण–मग तो भिक्षु असो वा गृहस्थ, श्रीमंत वा दरिद्री–पण अेकाच जातीचे समजले जातात. म्हणजे त्यांच्यांत जन्मजात अस्पृश्य कोणी नाहीं; रोटीबंदी नाहीं; अितकेंच नव्हे तर बेटीबंदीही नाहीं. ते सारे बुद्धधर्मी अहिंसक असले तरी खातात मांस नी अंडीं. आपल्या अिकडेही अहिंसकाचा अेक पंथ जो आतांशीं निघाला आहे, तो जसा मनोवाक्कायशः अहिंसेचा जयजयकार करीत

असताच सभांतून एकमेकांवर निःसंकोचपणें अंड्याचा माराही करीत असतो, तसेंच हें !

तिबेटांतील अेक कौटुंबिक विशेष म्हणजे, एका स्त्रीस अेकाच वेळीं अनेक पती असू शकतात, हा होय. भूतानमध्यें, नेपाळांतील काही हिंदु जातींतही आणि तिबेटात बहुपतित्वाची चाल आजही अगदीं रूढ आहे. तींत कोणच्याही प्रकारची अनीति आहे, अधर्म आहे, असें त्याना सागितलें तरी पटत नाहीं. जसें आपल्या अिकडे अेकाच पुरुषाला अेकाच वेळीं अनेक भार्या असणें, ही अेक अगदीं स्मृतिमान्य शिष्टाचाराची गोष्ट, अधर्म नव्हे; तशीच तिकडे अेका स्त्रीला अेकाच वेळीं अनेक पती असणें हा अेक अगदीं चालू आचार, अधर्म्य तर नव्हेच नव्हे. त्यांतही विशेष हा कीं, कुटुंबात जर अनेक भाअू असले आणि एकाच भावानें लग्न केलें तर त्याची जी पत्नी ती अितर सर्व सख्ख्या भावांचीही धर्मपत्नीच समजली जाते. या चालींत त्यांना लवलेशही अनीति वा अधर्म वाटत नाहीं. उलट पक्षीं अेका भावानें आपल्यापुरतीच तेवढी अेक बायको आणावी आणि त्याचे अितर भाअू तसेच अविवाहित पडलेले असता आपण तेवढे अेकट्यानेंच दापत्य-सुख भोगण्याचा आपलपोटेपणा करावा, हीच प्रवृत्ति त्याना अत्यत नीच वाटते !

विवेकानंद अेकदा अशा कुटुंबांतील कांहीं लोकांना जेव्हां म्हणाले कीं, "आपल्या भावाच्या पत्नीशीं असा व्यवहार ठेवणें अनैतिक आहे. भ्रातृजाया ही मातेसमान मानणें हाच मनुष्यधर्म!" तेव्हा त्या लोकाना मोठें आश्चर्य वाटलें! त्यानीं विवेकानंदांना जसें तेव्हा हटकलें, तसेंच ते त्यांना हंसणाऱ्या सर्वांना अुपहसून हटकतात कीं, "तर मग आम्ही आमच्या सख्ख्या भावाची प्रतारणा करून, त्याना त्या सुखाचा वांटा न देतां अेकट्यानेंच तें दांपत्यसुख भोगावें काय? मास, लोणी, घर, धन, आम्ही भाअूभाअू जर वांटून घेतो, कोणचेंही सुख आपलपोटेपणानें अेकटेंच तवढें भोगीत नाहीं, तसें करणें हें सख्ख्या भावाशीं कपट करणेंच समजतो, तर त्या सर्व सासारिक सुखांतील अत्यंत सरस नी प्रेमळ असें जें नववधूच्या प्राप्तीचें सुख त्याचा वांटा तर त्याना दिलाच पाहिजे, नव्हे काय? हा तर निव्वळ अधमपणा होय कीं, पत्नी तेवढी अेकाच भावानें लाटावी! भ्रातृप्रेमाला कलंक लावणारा हा असा स्वार्थीपणाचा अुपदेश आम्हांस देअूं नका! असा अधर्म आम्ही केव्हांही आचरणार नाहीं!"

भूतानी लोकांनीं विवेकानंदाना जे असें अुत्तर दिलें, तिबेटी लोक आजही ज असेंच ठासून सागतात, तें काहीं त्याच्यासारखीं 'भुतें' किवा 'भंगड' लोकच या कलियुगांत तेवढें सांगतात, असें नाहीं! कलियुग लागण्यापूर्वी जेव्हा प्रत्यक्ष धर्मराजापुढें द्रौपदी ही अर्जुनानें वरली असता ती त्याची अेकट्याची पत्नी समजावी वा पाची पाडवांची समजावी हा प्रश्न पडला, तेव्हां कुंतीनें नी व्यासानींही त्याचें असेंच अुत्तर अशाच कोटिक्रमानें समर्थून दिलेलें आहे! या आडवळणी गावीं सदर्भग्रंथ हाताशीं नसल्यामुळें नेहमीच लेखांतून अुतारे देण्याच्या कामीं फार नड पडते; नाहींतर महाभारतांतील ते मूळचे श्लोक अिथें अगदीं जसेच्या तसे अुतारून द्यावयास हवे होते. मूळ महाभारतातील द्रौपदी-स्वयंवराच्या अध्यायांतील ते श्लोक जिज्ञासूंनीं अवश्य पहावेत. कुरुवंशांत द्रौपदीचा प्रश्न अुद्‌भवण्याच्या पूर्वीही अनेक बंधूंनीं अेकच भार्या करण्याची चाल हा अेक शिष्टसमत कुलाचार होता, असें कुंती प्रभृतींनीं धर्मराजास सांगितलें आणि त्याचीं प्राचीन अुदाहरणें अुल्लेखिली आहेत. याहीपेक्षां आपल्या अंगावर शहारे आणणारी पण तिबेटात आचारधर्म समजली गेलेली अेक प्रचलित रूढी अशी कीं, जर बापाची स्त्री मेली असेल आणि त्याच्या वडील मुलानें लग्न केलें, तर ती वधू त्या पित्याची पण पत्नीच मानली जाते. अुलटपक्षी कुटल्या विधवेनें जर लग्न केलें तर तिच्या पहिल्या पतीपासून झालेल्या साऱ्या तरुण मुली पण त्या आअीसहच त्या तिच्या नव्या पतीच्या भार्या होतात. मुली आणि आअी प्रेमळ सवतीसवतींच्या नात्यानं नादतात!

आपल्यास जी गोष्ट अत्यंत किळसवाणी, अनैतिक नी अधर्म्य वाटते, ती रूढी, वा चाल, वा आचार जगाच्या आरभींच देवानें 'धर्म' म्हणून सर्व मनुष्यजाती-साटीं सांगून टाकलेला आहे, अशी तिबेटांतील सनातन्याची निष्ठा! नीति नी अनीति ह्या वस्तू चौकोन वा त्रिकोणाप्रमाणें अगदीं ठराविक साच्याच्या, अेकटशी, अेकछापी, त्रिकालाबाधित असतात, किंवा आपल्या कुराणांत वा पुराणात जें चांगलें म्हणून वा वाअीट म्हणून सांगितलें आहे, तेंच सर्व परिस्थितींत, सर्व मनुष्यसमाजांत चांगलें वा वाअीट टरलेंच पाहिजे, हा हट्टवाद किती चुकीचा आहे, तें भिन्नभिन्न परिस्थितींत भिन्नभिन्न समाजामध्यें प्रचलित असलेल्या धर्मांचा, रूढींचा नी शिष्टाचाराचा असा तौलनिक अभ्यास केला असतां सहज समजून येतें. आपल्यास जो आचार शुद्ध नी हितकर वाटतो, तो आपण आचारावा,

पण तोच्च काय तो सनातन, त्रिकालाबाधित, अीश्वरोक्त 'धर्म' होय, आणि अितर साऱ्या परिस्थितींत तोच्च मानला पाहिजे, तो हितप्रद झालाच्च पाहिजे, तो अपरिवर्तनीय धर्म असलाच्च पाहिजे, असा धर्मवेडा दुराग्रह मात्र धरू नये.

ज्या बुद्धानें देहदंडक अशा आसुरी तपाचा तीव्र निषेध केला, त्याच्च बुद्धाच्या धर्माची भिक्षुदीक्षा देताना तिबेटात जे संस्कार भिक्षुगणाना करावे लागतात, ते बुद्धाच्या त्या अुपदेशाची कशी मूर्तिमंत विटंबनाच्च असतात, त्याचेंही अेक अुदाहरण सांगू या.

तो संस्कार प्रत्यक्ष पाहिलेला अेक प्रवासी लिहितो :

"प्रभाताची वेळ. ब्राह्ममुहूर्त. तपस्याव्रत घेण्यासाठी सज्ज असे भिक्षुगण स्नान करून शुद्ध वस्त्रे धारण करून आले. शाक्यमुनीच्या विशाल मूर्तीसन्मुख मंत्रपठण चालू झालें. कधीं एकेकीं तर कधीं सारेजण मिळून अुच्च स्वरानें मंत्रघोष होअू लागला. मोठमोठे लाकडी ढोलही वाजूं लागले. जवळ जवळ सत्तर भिक्षुगण गुडघे टेकून बद्धांजलि होत्साते दीक्षेस सिद्ध झाले. मेण, कोळसे, शाअीच्या कुप्या प्रभृति सभार अेका बाजूस ठेवलेला होता. चटअीवर बसून बाकावर त्यांनीं हात ठेवले. प्रधान भिक्षुगणानें शाअीचीं बाराबारा चिन्हें प्रत्येक दीक्षेच्छूच्या मस्तकावर केलीं. धूप नी अुदबत्त्या पेटविल्या गेल्या. सर्वजणानीं मिळून प्रार्थना म्हणण्यास आरंभ केला : नमो पेनशितो शिःकिया मौनी फूः ! 'हे शाक्यमुने, तुला प्रणाम असो ! आम्ही तुला शरण रिघत आहों !' या मंत्राच्या घोषात सारे तन्मय होत असता प्रधान भिक्षूंनीं त्या दीक्षेच्छूच्या टाळूवरील त्या शाअीच्या चिन्हातून जळजळीत निखारे ठेवण्यास आरंभिलें होतें. दीडदोन मिनिटाच्या आत टाळूच्या कातड्यापर्यंत निखाऱ्याची आग पोंचली. चटके बसूं लागले, तों तों अधिक बळानें तो मंत्रपाठ ते सारेजण अुच्च अुद्घोषूं लागले. मस्तकावरचीं कातडीं जळूं लागली. जे धीरगंभीर होते ते भिक्षु टाळु जळूं लागली तरीही 'अुस्स' न करता वारंवार मंत्र म्हणतच्च होते—'नमो पेनशितो शिःकिया मौनी फूः !' पण जे तो दाह साहूं शकले नाहींत, ते कासावीस होअूं लागले. हें पहातांच प्रधान भिक्षूंनीं त्या प्रत्येक दीक्षेच्छूचें मस्तक आपल्या हातानीं बळकट धरून त्यास हालूं दिलें नाहीं. जिकडे तिकडे कातडें जळण्याचा अुग्र गंध दरवळून गेला. प्रत्येकाच्या मस्तकार ठेवलेलीं ठराविक अग्निस्फुलिंगें जळून जाअीतों तो दीक्षासंस्कार चालू होता. अशा प्रकारें प्रत्येकाच्या मस्तकावर जन्मभर रहाणारी बुद्ध-शरणाची ती 'तप्तमुद्रा' मारली गेली ! डाग दिला गेला !"

स्थंडिलावर यज्ञाग्नि पेटविण्याची चेष्टा करणाऱ्या बुद्धाच्या शिष्यानींच माणसाच्या डोक्यावर यज्ञाग्नीचे निखारे पेटवून बुद्धाचा असा न कळत सूड अुगवला!!

ज्या तिघा चौघां आजकालच्या तिबेट पाहून आलेल्या प्रवाशांच्या वृत्तांतावरून तिबेटची जी थोडीशी ताजी माहिती दिलेली आहे, त्यातूनच आणखी जो अेक प्रख्यात भारतीय प्रवासी अलीकडेच तिबेटला जाअून आला आहे, त्याचाही ओझरता तरी परिचय अिकडील वाचकाना करून देणें अिथे अवश्य आहे. त्या प्रवाशाचें नांव त्रिपीटकाचार्य राहुल सास्कृत्यायन हें होय. अर्वाचीन नी प्राचीन साहित्याचें गाढ अध्ययन केलेल्या ह्या पंडिताचा जन्म सयुक्त प्रातातील अेका ब्राह्मण कुटुंबांत झाला. राजकीय आंदोलनात स्वदेशा प्रीत्यर्थ त्याना दोनदा बदिवासही भोगावा लागला. समाजसत्तावादावरही त्यानीं अेक पुस्तक लिहिलेले आहे. अिंग्रजी, सस्कृत, पाली ह्या तिन्ही वाङ्मयाचा त्यानीं अभ्यास केलेला असून तत्त्व नी धर्म ह्याच्या तुलनात्मक विज्ञापनातील ते अेक आजचे प्रगाढ पंडित आहेत. तिबेटात अत्यत कष्ट सोसून त्यानीं अेकंदर तीनदा प्रवास केला, महिनोगणती निवास केला. त्याचा मुख्य हेतु हा होता कीं, भारतीयाची जी अमूल्य ग्रंथसपत्ति पूर्वकालीं तिबेटात नेली गेली ती, आणि जे अनेक भारतीय महापडित नी महाभिक्षु तिबेटातच धर्मप्रचारार्थ आजन्म निवसत असता तिकडेच मोठमोठे ग्रंथ लिहिते झाले, त्याची ती सारी ग्रंथसपत्तीही भारतात परतीं आणावी. ह्या दुर्घट कार्यी त्याना अितके अथक परिश्रम सोसावे लागले, पण शेवटीं अितकी सफलता मिळाली कीं, आज त्यांच्या ह्या यशाचा डिडिम अैतिहासिक जगात दुमदुमून राहिलेला आहे. तिबेटातील मोठमोठ्या मठातून नाना अुपायानीं यानीं प्रवेश मिळवून, कोणीं कधीं न पाहू शकलेलीं ग्रंथभाडारें धुंडाळून, त्यातील ग्रथाच्या प्रती लिहून आणि शेवटीं त्या कडक थंडींत लिहिता लिहिता लिहिणें दुर्घट झाल्यानंतर मूळ ग्रंथाचीं छायाचित्रे काढून तें सारें अफाट साहित्य अुटावर लादून हिंदुस्थानांत अलीकडेच परत आणलें आहे.

भारतात ग्रथिलेलीं हीं मूल्यवान् पुस्तकें, पूर्वी जेव्हा मुसलमानाच्या विध्वंसक धर्मवेडाच्या अुत्पाताची धाड भारतावर कोसळली तेव्हां, त्यांच्या संरक्षणासाठीं भिक्षूंनीं महाप्रयासें नेअून, हिमालयाच्या दुर्लंघ्य तटबंदीनें बचावलेल्या तिबेटातील मठामठातून ठेवलेलीं असावीं. त्याच्या मूळ प्रती भारतात तेव्हापासून गेलीं सहा शतकें तरी दुर्लभ झाल्या होत्या. पण त्यांचीं नांवें अितर ग्रंथांतून जीं येतात, त्यामुळें ते ग्रंथ होते, अितकी निश्चिति तेवढी मागें अुरली. तिच्याच अनुरोधें शोध करतां करतां आज मूळ प्रती सांपडल्या.

# पंधरावा किरण

## राहूल सांस्कृत्यायन यांचें तिबेटमधील संशोधन

गेल्या सहा महिन्यांत फ्रान्स, जर्मनी, रशियापर्यंत ज्या भारतीय अितिहास-संशोधकाचें नांव प्राच्यविद्यापंडितांमध्यें दुमदुमून गेलें आहे त्या त्रिपीटकाचार्य राहुल सांकृत्यायन याची आणि त्यानी महत्प्रयासें केलेल्या अैतिह्यसंशोधनाची थोडीशी ओळख महाराष्ट्र वाचकांनाही या लेखानें करून देण्याचें आम्हीं योजलें आहे.

बिहारचे प्रसिद्ध अैतिह्यसंशोधक पंडित जायस्वाल यानींही त्याच्या अलीकडेच छापलेल्या अेका लेखांत सांकृत्यायनाच्या या संशोधनानें भारताच्या साहित्यात नि प्राचीन अैतिह्य साधनांत फार महत्त्वाची भर टाकली असल्याचें मान्य केलें आहे.

बुद्धकालांतील नि त्यानंतरच्या तीन चार शतकांतील भारतीयांनीं लिहिलेले कित्येक महत्त्वाचे ग्रंथ लुप्त झाले होते. परंतु त्याचे जे संदर्भ नि अवतरणें अितर अुपलब्ध ग्रंथांतून वारंवार सादर अुल्लेखिलेली आढळतात, त्यावरून त्या ग्रंथांच्या अस्तित्वाची नि महत्वाची निश्चिति पटत असे. ते मूळ ग्रंथ पुन्हां कधीं सांपतील का, त्यांच्या प्राचीनत्वामुळें बुद्धकालच्या आपल्या प्राचीन अितिहासावर जो प्रकाश पड-ण्यासारखा आहे तो पडून तो अितिहास अधिक प्रस्फुट अुज्वलतेनें झळकूं शकेल

---
प्रतिभा, मे १९३७

काय, अशी चुटपुट गेलीं शंभर वर्षे तरी आपल्या भारतातील प्राच्य-विद्या-पंडितांनाच काय ती नव्हे तर युरोपातील प्राचीनैतिहासिक विद्वानानाही लागून राहिली होती. पण ते ग्रंथ हुडकून काढण्याचा सतत यत्न चहूंकडे चालला असताही त्याचीं समग्र तर काय पण फुटकळ पानें देखील आजवर सांपडलीं नव्हतीं. परतु त्रिपीटकाचार्य राहुल सांकृत्यायनाच्या अत्यंत त्रासदायक अशा तिबेटातील तीन वेळा केलेल्या प्रवासानंतर नि प्रयासानंतर आज ती अलोट ग्रंथसपत्ति तिबेटांतील अत्यंत दुःप्रवेश्य अशा काहीं मटातून साठवून ठेवलेली आढळली आहे. त्या ग्रंथाच्या अुपप्रतीच नव्हत तर काही अतिप्राचीन ग्रंथाच्या मूळ प्रतीच सांपडल्या. भारतीय साहित्याच्या, तिबेटांत सापडलेल्या, शतावधि ग्रंथाना अनेक अुटावर लादून ती विलुप्त ज्ञानसंपदा श्री. राहुलचार्यांनीं सहा सात शतकानंतर आज भारतात पुन्हा परत आणली आहे.

अर्वाचीन नि प्राचीन साहित्याचे अध्ययनात पंडितपद संपादिलेल्या आचार्य राहुलजींचा जन्म सयुक्त प्रांतातील अेका ब्राह्मण कुटुंबात झाला. चालू राजकीय आदोलनांत त्यांना दोनदां बंदिवासही भोगावा लागला. समाजसत्तावादावरही त्यानीं अेक पुस्तक लिहिलेलें आहे. अिंग्रजी, सस्कृत नि पाली या तिन्ही साहित्यातील तुलनात्मक तत्त्वज्ञानाचा नि धर्मशास्त्राचा त्यानीं विशेष अभ्यास केलेला आहे. तिबेटांत भारतीयाची जी ग्रंथसपत्ति आहे तिचें अेकदा कसून सशोधन व्हावें, नि तिबेटातील मोटमोठ्या ज्या प्राचीन मठातील विशाल ग्रंथसग्रहावर अद्यावत् संशोधनाचा चिकित्सक प्रकाश असा पडलेलाच नाहीं त्याच्यावरही त्या शोधज्योतीचा झोत पाडून अितिहासादिक विषयीं भारतासबंधीं अशी जी काय माहिती मिळू शकेल ती अेकदा निश्चित करून टाकावी, ह्या हेतूनें त्यानीं तिबेटमध्यें नानाविध संकटांना नि अरिष्टाना तोड देऊन तीनदां प्रवास केला. महिनोंगणती त्या पुरातन नि प्रजीर्ण मटांतून कडक थडींतसुद्धा अेकसारखे कुडकुडत बसून अनेक दुर्मिळ ग्रंथांचा अभ्यास केला. त्यात जेव्हां त्याना भारतीयाचे हरवलेले ग्रंथ सांपडले तेव्हां त्यांना कृतकृत्य झाल्यासारखे वाटलें; नवा अुत्साह नी नवी शक्ति सचरली. दिवसानुदिवस माडी मोडून बसून त्यांनीं त्या मोठमोठ्या ग्रंथांना प्रतिविप्याचे परिश्रम चालविले. केव्हा केव्हा थकव्यानें नि थडीनें त्यांना मूर्च्छा यावी! तेव्हा तिबेटांतील रीतीस अनुसरून मांसाहार नि मध या औषधींना ते सेवूं लागले! पण कार्य सोडलें नाहीं. शेवटीं जेव्हां विलुप्त अशा भारतीय ग्रंथांचीं

भांडारेंच अुपलब्धूं लागली तेव्हा प्रतिविण्याची शताची शक्ति अपुरी पडणारच पडणार असें पाहून त्यानीं पानापानांचीं छायाचित्रे घेण्याचा सपाटा चालविला. अशा परिश्रमांनंतर ते प्रतिविलेले ग्रंथ, नि मूळचेच जे आणता आले ते मूळ ग्रंथ, मिळून त्या शतावधि पुस्तकाना अनेक अुंटावर लादून त्यानीं हिंदुस्थानात परत आणलें.

ह्या ग्रंथाची कच्ची टिपणी निरीक्षून नी ज्या ग्रथाच्या शोधास्तव युरोपियन नी भारतीय प्राच्यविद्यापडित आजपर्यंत खटपटत होते, ते ग्रथ अुपलब्धिल्याचे समक्ष पाहण्यासाटीं हिंदुस्थानात यावयास निघाले आहेत.

बुद्ध कालाच्या दीड दोन सहस्र वर्षाच्या पूर्वीचा अितिहास नि समाजस्थिति ह्यांवर प्रकाश पाडणारे भारतीय विद्वानानीं लिहिलेले हे शतावधि ग्रथ गेली सातशें वर्षे भारतात तरी जे नामशेप झाले होते ते का? त्यांना तिबेटसारख्या परकीय देशांतील जुनाट ओसाड नि अप्रसिद्ध अशा मटामटातून प्रदीर्घ अज्ञातवासात रखडत का पडावें लागलें?

त्याचें मुख्य कारण मुसलमानी धर्मवेडाचा आततायी अुत्पात! अलेक्झाड्रियाचे अमूल्य ग्रथालयाला जेव्हा मुस्लिम सेनापतीनें आग लावून दिली तेव्हां तो म्हणाला होता, "पाखंडाच्या ह्या ग्रथात जर कुराणातच आहे तेंच असेल तर ही नसती अडगळ आहे! अेक कुराण आहे ते पुरें! बरें, जर ह्या ग्रंथामध्यें कुराणात नाहीं तें असेल तर हें अुपद्रवी असत्य आहे! कारण जे कुराणात नाहीं तें सत्य असूंच शकत नाहीं! तेव्हा दोन्ही पक्षीं या ग्रथालयाचा नाश करणेंच अिष्ट!"

ह्या धर्मवेडापायीं ग्रीकाच्या नि रोमनाच्या ग्रंथालयांची राख झाली. पारसिकाच्या विद्यापीटांचीही तीच दुर्दशा अुडाली. तक्षशिलेचें प्रख्यात विद्यापीठ विध्वंसिलें गेलें. बिहार प्रांतांत तर मठामटातील प्रचड ग्रंथालयांचीच नव्हे तर सहस्रावधि भिक्षूंचीही कत्तल अुडाली, आणि शेवटीं बख्त्यार खिलजीनें अखिल आशियातील सर्वोच्च महाविद्यापीट जो नालंदा विहार त्यावरही नागर फिरवला! सहस्रावधि पंडित, पाटक, विद्यार्थी, भिक्षु, साधक, सिद्ध निवसूं शकणाऱ्या त्या विस्तीर्ण विद्यानगरीच्या प्राकारांचा, तोरणाचा, मटाचा, मंदिराचा, मूर्तीचा त्या विध्वंसक आततायानें तुकडे तुकडे अुडवून चुराडा अुडविला. मुस्लीम तवारीखकारच मोठ्या डौलानें सांगतात कीं, त्या नालंदा विहारांतील ग्रंथालयाना बख्त्यार खिलजीनें जेव्हां आग लावून दिली तेव्हां त्या ग्रंथांच्या होळ्या महिनोंगणती जळत राहिल्या होत्या!

ह्या महमदीय अुत्पाताचे संकटकाली शतावधि भिक्षूंनीं नि पंडितानीं अमूल्य ते ते ग्रंथ वाचविण्यासाठीं गुप्तपणें नेपाळातून तिबेटकडे धाडले. हिमालयाच्या दुर्लंघ्य तटबंदीनें सुरक्षित नि अलक्षित अशा तिबेटातील मटामठातून त्याच्या प्रती जतन केल्या गेल्या. पण भारतात मात्र त्याच्या येथील अस्तित्वाची स्मृतिसुद्धा विलेपून गेली. ती सात शतके हरवलेली ग्रंथसपदा आज राहुलाचार्यांनीं भारतात पुन्हा परत आणली आहे. त्यातील अनेक ग्रंथाच्या विवासनाची कहाणी अशी आहे !

अशा त्या विध्वंसक अुत्पातांतही ज्या भिक्षूंनीं नि पडितानी आपले जीवही धोक्यात घालून अनेक अमूल्य ग्रंथ तिबेटासारख्या सुंदर नि दुष्प्राप्य अशा देश-विदेशीं गुप्तपणें वाहून नेअून जतन करून ठेवले, त्याचे अुपकार आज साऱ्या जगातील प्राच्यविद्याविशारद् नि अैतिहासिक युरोप-अमेरिकेंतही जे मनःपूर्वक मानीत आहेत ते कांहीं अुगीच नाहीत !

बाबिलोनियांतील प्राचीन अिष्टिकालेखांचें किवा मोहेंजोदारो येथील नाणका-लेखाचें संशोधन अेका दृष्टीनें जितके महत्त्वाचें, तितकेच दुसऱ्या दृष्टीनें राहुल सांकृत्यायनांचें हें तिबेटीय ग्रंथसंशोधनही महत्त्वाचें आहे, त्याना भूषणार्ह आहे, भारतीयांना गौरवास्पद् आहे.

काशी येथील नगरगृहामध्यें प्रो. पुणताबेकर याचे अध्यक्षतेखाली साकृत्यायनाचें हिंदु विश्वविद्यालयाच्या बौद्ध व्याख्यान-मालेंत तिबेटीय अनुभवावर एक विस्तृत व्याख्यान अलिकडेच झालें. परंतु व्याख्यानातील दोनतीन चटकदार गोष्टीच काय त्या ह्या लहानशा परिचयात्मक लेखात सागतां येतील. त्या अशा :

"तिबेटमध्यें जाऊ लागतांच," साकृत्यायन सागतात, "मी आपलें तोंड नि हात धुणें सोडून दिलें, आणि त्याना खूप गदळ होअू दिलें." कारण तिबेटच्या सामान्य जनतेंत हात वा तोंड किंत्येक आठवडे साफ असे धुवीतच नाहींत ! तिकडच्या कडक थंडीमुळें ही संवय जडली असावी ! "मी तोंड-हात धूत नसें; अशासाठीं कीं त्यामुळें तिबेटी नसून कोणी परकीय मनुष्य आहें हें तिबेटी गावकऱ्यांना चटकन् कळूं नये. पण तरीही माझ्या सरळ नि लांब नाकावरून मी पकडला जाअीं तो जाअींच."

आपल्या अिकडचीं नवनवीं रंगीत छापाचीं चित्रें तिबेटातील लोकाना दाखविली असता त्याना फार आवडतात. आजचा छापखाना असा तिबेटांत नाहींच मुळीं! सांकृत्यायन म्हणतात, "मासिकातली स्त्रियाचीं अनेकरंगी चित्रे मीं माझ्यापाशीं कातरून ठेवली होतीं. तिबेटी लोक म्हणत, 'किती सुंदर चित्रें हीं!' पण लगेच हळुहळू लागत, 'चः चः! पण हें नाक हो काय सरळ नि लांब! त्या अुंचट नाकानें सगळें सौंदर्य बिघडून गेलें बघा या सुदर मुखड्याचें!'

तिबेटी लोकांच्या स्त्रियाचीं नाकें अगदीं नकटी नि बसकीं असतात. त्या प्रिय-करणींच्या सगतीनें तिच्याविषयीं वाटणारी आवड त्या नकट्या नाकाच्याही वाट्यास आली. खडीसाखरेचा डबा भिकार टिनचा असला, आणि पातळ कोयनेलची बाटली जरी सुरेख गुलाबी रंगाची असली, तरी खडीसाखरेच्या गोडीमुळें लहान मुलाना भिकार टिनचा डबाच जास्त हवासा वाटतो. तो भिकार टिनचा डबा पाहताच जसें मन आनंदतें, तसें ती पातळ कोयनेलची बाटली सुरेख गुलाबी असली तरी आनंदत नाही! कोयनेल कडू, त्यामुळें ती सुरेख बाटलीच कडवट वाटते. तसेंच हे सवयीमुळें नकटे नि बसकें नाक पाहताच तिबेटच्या लोकाच्या मनात त्यांच्या प्रियकरणींच्या ज्या स्मृति जागून उटतात, तशा सरळ नि लाब नाकानी होत नाहींत सौदर्याच्या कल्पना देखील कांही अंशीं या संवयीचा परिणाम असतो तो असा! तिबेटी लोक अेकदरींत सत्यवादी असतात. ते सहसा खोटें बोलत नाहींत. ते रागावले तर मारहाण करतात. शीघ्रकोपीही फार. पण त्यांच्या 'मुखमें राम और बगलमें छूरी' नसते. त्याना केंसानें गळा कापण्याची कला अद्याप चागलीशी म्हणून साधलेली नाहीं. पृथ्वी वाटोळी नाहीं, सपाट आहे; कारण बुद्धग्रंथांत ती सपाट सांगितलेली आहे, हा त्यांचा आजही अढळ विश्वास आहे. साकृत्यायनानीं त्याना पृथ्वी गोल असल्याचे पुष्कळ पुरावे दिले. पण त्यांच्यांतील धर्ममार्तंडाचें काय किंवा खेडवळाचें काय, एकमुखी अुत्तर हेंच कीं, 'पोथी तसें म्हणत नाहीं! म्हणून पृथ्वी गोल असणेंच शक्य नाहीं!' ते बिचारे शात दांत बौद्ध भिक्षु अितक्या निषेधा-वरच थांबले. पण शास्त्रज्ञानीं जेव्हां युरोपला प्रथम सागितलें कीं, 'पृथ्वी गोलच आहे!' तेव्हां त्या काळच्या त्या खिश्चन मार्तंडांनीं, पोपांनीं नि पाद्यानीं 'बायबलांत पृथ्वी सपाट सागितली आहे. यास्तव ती सपाटच आहे.' हें सिद्ध करण्यासाटीं निर्विवाद पुरावा जो पुढें आणला तो त्या शास्त्रज्ञाचें डोकेंच कापून

टाकणें हा ! कुराणातही पृथ्वी सपाटच आहे. कदाचित् असेंही असेल कीं, कुराण, पुराण लिहीतो पृथ्वी सपाट होती; मागाहून गोल झाली ! !

तिंबेटच्या लोकांनीं तें कारण नक्की केलें आहे. बिहारचा भूकंप का झाला तें सांकृत्यायनाना तिबेटियनांना पटेल असें सांगता येईना. तेव्हां तिबेटच्या लोकांनीं त्याचा अगदीं बिनतोड अुलगडा असा केला. ' माचोलेमो ' ( गौरीशंकर किंवा अेवरेस्ट ) हें जें हिमालयाचें अत्युच्च शिखर तें वस्तुतः पर्वताचें शिखर नसून पार्वतीदेवी आहे. तिच्या भोवतालचीं चार शिखरें तिच्या चार दासी देवता आहेत. त्याना असा वर आहे कीं तुमच्यापाशीं लगट करण्याचें जो साहस करील तो नष्ट होईल. असें असतांही गेल्या वर्षी अिंग्रज लोक त्या गौरीशंकर शिखराभोंवतीं विमानातून घिरट्या घालण्याचें धारिष्ट करूं लागले ! त्यामुळें माचोलेमोदेवी सतापली आणि तिनें बिहारचा बिहार भूकपात गडप करून टाकला !

आहे कीं नाही हा पोथींतील कार्यकारणभाव बिनतोड ? अपराध केला इंग्रजानें, आणि त्याचें शासन म्हणून भूकंपात गडप झाला बिहार. पण इंग्रज कुठचे नि बिहार कुठचा, ते अेक कीं दोन, हे समजण्याअितका भूगोल तरी यावयास पाहिजे ना ? आपल्या अिकडे नाही का अगदी पेशवाअीच्या शेवटीं शेवटीं अेक मराठा सरदार इंग्रजी पलटणी चहूकडून चालून येताहेतसें ऐकून सतापानें अेका पत्रात विचारिता झाला, " हे शिन्‌चे अिंग्रज लोक असे आहेत तरी किती ? " ह्या अैतिहासिक पत्राचें अुत्तर काय आलें तें अुपलब्ध नाहीं. पण अिंग्रजांची विलायत पहायला जर कोणी सात पिढ्यात तोंवर गेलाच नव्हता, समुद्रपर्यटनच जर मुळीं धर्मबाह्य, तर ' हे शिन्‌चे अिंग्रज असे आहेत तरी किती ? ' ती शिरगणती प्रत्यक्ष मोजून सागणारा साऱ्या साम्राज्यांत कोणीही सांपडणें दुर्घटच होतें हें उघड आहे !

तरीही गौरिशंकर ( अेवरेस्ट ) शिखरावर ' अिंग्रेज विमानें धाडूं लागला म्हणून मांचोलेमोदेवीनें रागावून बिहारचा भूकंप करविला, ' हा तिबेटच्या धर्मात्म्याचा अुलगडा काहीं झालें तरी आमच्या अिकडील महात्म्यांच्या अुलगड्यापेक्षां कांहीं फारसा चुकलेला नाहीं, अितकें आपणांस मान्य केलेंच पाहिजे ! कारण महात्मा गाधीनींही स्पष्टपणें सागितलें होतेंच कीं नाहीं, ' आम्ही अस्पृश्यता निवारून मद्रासच्या गुरुवायुरचें देवालय अस्पृश्यांस अुघडलें नाहीं, यासाठीं देव

रागावला, आणि त्या पापामुळें बिहारचा भूकंप झाला. ' गुरुवायुरचें देवालय अस्पृश्याना न उघडण्याचें पाप करणारा झामोरिन नि सारा मद्रास ज़िलाखा सुखरूप. त्याच्या घराचें अेक कौलसुद्धा फुटले नाहीं. पण त्या मद्रासच्या झामोरिनाच्या पापासाठीं भूकंपांत मेली बिहारचीं सहस्त्रावधि पुरुष, बायका, मुले, स्पृश्याचीं आणि अस्पृश्याचीं ! ती तिकडची माचोलोमोदेवी आणि हा अिकडचा महात्मिक देव! दोन्हीही अेकाच पोथीच्या पाळण्यात वाढलेली भावडें!

राहुल साकृत्यायन सन्यासी, शाकाहारी, बौद्ध, अहिंसाधर्मी; पण ते बजावून सागतात कीं, "मी तिकडे त्या बुद्ध लोकांप्रमाणेंच अंडीं, मांस आणि वनगायीसारखी अेक गोजातिविशेष जी चर्ममृगी तिचें मास, हींच खात होतो म्हणून जगलों. भाजीपाला खाअून तिकडे जाअूं म्हणणारे सज्जन पाडवासारखे वाटेंतच अेकेक गळून पडतील! मांस खाल्लें तेव्हा कुठें मला येऊं लागलेली मूर्च्छा बंद पडली."

राहुलजी सागतात, "जो तो विचारतो, ' तिबेटात आहेत म्हणून अैकलेले ते योगींद्राचे थवेच्या थवे भेटले का ?' पण त्याचा तिकडे कोणास पत्तासुद्धा लागत नाही! मला योगी बिगी कोणी भेटले नाहींत!"

जोंवर तिबेट अेक कल्पभूमि होती, तिकडे फारसें कोणी गेलेलें नव्हतें, तोंवर थिऑसफीचे अनेक अतिमानुष ' महात्मे ' आपली प्रचंड विश्वसंचालक कार्यालयें तिबेटांत नि हिमालयाचे शिखरावर उघडून बसलेले असत. त्या काळच्या थिऑसफीच्या पुस्तकातून पानोपानीं ह्या महात्म्याचा अचूक पत्ता जो दिलेला असे तो एकच : तिबेट! पण लॉर्ड कर्झनची गोरीं पलटणें तिकडे ल्हासापर्यंत जेव्हां दौडत गेली, आणि विमानें जेव्हापासून त्या शिखराशिखरांवर धुडगूस घालूं लागली, तेव्हापासून त्या योगी महात्म्यानीं आपली तीं विश्वसचालक मोठमोठीं कार्यालयें केव्हा बंद केली नि बाडबिछायतीसुद्धा ते सारेचे सारे कुठे बेपत्ता झाले त्याचें अेक अवाक्षरसुद्धा आजकालच्या थिऑसफिकल ग्रंथांतून आढळत नाहीं!

राहुलाचार्यांनीं आणलेल्या ग्रंथभांडाराची नीट छाननी झाल्यावर त्याचें सविस्तर वृत्त नि निश्चित महत्त्वमापन प्रसिद्धिलें जाअील.